# INIQUITIES

of the

# INAM COMMISSION

on the

# Presidency of Bombay

compiled

from the Published Selections from Govt Records

and other Sources



Exposed for the Information of Enamdars, &c.



POONA

1859

Printed at the Dyan Prakash Press

Price 10 annas

# मुंबई इलाख्यांतील इनामकमिशनरघात्यांतील

# गैरइनसाफ

छापून प्रसिद्ध केलेल्या सरकारी दप्तरच्या व

दुसऱ्या चांगल्या आधारावरून

इनामदार जाहागिरदार वगैरे लोकांच्या

माहितीकरितां प्रकट केले असत

शहर पुणें.

येथील ज्ञानप्रकाशछापखान्यांत

छापिलें.

सन्न १८५९

किंमत ॥=

# प्रस्तावना।

या मुंबई इलाख्यांत इंग्रजसरकारचा अम्मल सन्न १८१८ इसवी म्हणजे शके १७३९ ह्यासालीं झाला. त्यावे-ळीं नामदार आल्फिस्टनसाहेब कुलअखत्यार कमिशनर होते, त्यांनीं ह्या देशांतील रजवाडे, संस्थानी, जाहागीर-दार, व सरंजामदार इनामदार व जमीनदार. वर्षासनदा-र व देवस्थानी वगैरे लोक ह्यांनीं खुष व आबाद व्हावें, ह्याकरितां जाहीरनामा लावूंन त्यांत त्याजविषयीं खुला-सा करून हीं दाखविला. त्या जाहीरनाम्यावरून इंग्र-ज लोकांचें औदार्य व राज्यरीतीचा बाणा हें पाहून ह्या प्रांतींचे इनामदार व हकदार वगैरे लोकांस माजी रा-ज्याचे कारकिर्दीचें विस्मरण होऊन इंग्रजसरकारचें इ-मान व मेहरबानी यांवर खुष राहून आपल्या उत्पन्ना-चे उपभोग सुखानें कांहीं काळपर्यंत नेकरीत होते. पुढें एजेंटीनें ह्या लोकांवर विशेष दील पोंचवून त्यांस कांहींसें नाउमेद केलें त्यावर सुमारें सन्न इसवी १८४२ पासून

फारच कमताई करण्याचें मनांत आणिलें. पुढें सन्न१८५२ इसवींत सरकारानें एक आक्ट करून दुमालदार वगैरे लोकांच्या देणग्यांची कसून चौकशी करण्याकरितां इनाम कमिशनरखातें नवेंच काढिलें. तें अद्यापि चिरंजीव आहे. १८५२पासून तर ह्या हकदार वगैरे लोकांचीं मनें उदास व भयभीत झालीं. आणि त्यांचे ठायीं विचार व उद्गार नानातऱ्हेचे येऊं लागले; कारण, एकतर वडिलोपार्जित चालत आलेलें उत्पन्न, त्यांत बहुत वर्षांचा भोगवटा आणि त्यावर राज्यक्रांति झाल्यावर सरकारचें पुरें अश्वासन इतकी खबिरी असतां एकाएकीं आपणावर सरकारची वक्र व कृपण दृष्टि झाली आहे; त्यापेक्षां आपलीं उत्पन्नें बुडविण्याचें आपल्या सरकारचे मनांतून आहे, असें वाटूं लागलें व इनामकमिशनरवाल्यांचें गोप्य व दरारा यांहींकरून लोकांची निराशा होऊन ह्या दयाळू व राज्यकारभार थोर दृष्टीनें करणारे सरकार-

# प्रस्तावना

लागले, आणि सर्वांचे विचार हें इनामकमिशन व त्याची कर्तबगारी हीं नष्ट व्हावीं अशी इच्छा करूं लागले; परंतु ती त्यांची आशाणी मनीषा तृप्त होण्याचें साधन, सामर्थ्य, व शाहाणपण ह्यांची त्यांमध्यें कमताई असल्यामुळें ती दडून राहिली. त्या लोकांचा प्रवेश वरिष्ठ सरकारापर्यंत होणें मुष्किल; त्यांस राज्यरीतींत माहिती असावी, तर तिचा अभाव; तेव्हां अर्थातच मूग गिळून बसणें त्यांस जरूर झालें.

पण आतां विलायतेचे राणीचा आपणावर अमल झाला आहे, त्यामुळें आपणास दाद मागण्यास थोर स्थान प्राप्त झालें आहे. तस्मात् आपली काय मागणीं आहेत, व आपलें इनामकमिशनरवा त्यापासून किती नुकसान आहे, त्याविशीं विचारपूर्वक कळविण्यापासून आपलें नुकसान नहोतां इजाही पोंचणार नाहीं. असें पाहून इनामकमिशनरवा त्यांतील सामान्यरीत्या चालू हकी-

करून लिहिली नाहीं, तत्रापि या सारावरून लक्षणा करितां येण्यास कांहीं हरकत पडणार नाहीं.

हाल्लीं आमचें मोठें भाग्य समजतों कीं, आम्ही वि-लायतेचे राणीची रयत झालों आहों, तेव्हां आमचे रा-स्त विचार कळवून दाद मागण्यास आम्हां रयतेस पूर्वी-पेक्षां स्वातंत्र्य अधिक प्राप्त झालें आहे. ईश्वर त्या आप-ल्या राणीस दीर्घायु करो, आणि तिच्या सत्तेखालीं आ-म्ही राहून तिच्या हातून आपल्या देशांची.नंष्टचर्या फिरवो हीच तूर्त आपली इच्छा आहे.

---

# अनुक्रमणिका

| | | पृष्ठ |
|---|---|---|
| १ | प्रस्तावना | ४ |
| २ | इनामकमिशनरचा त्याची उत्पत्ति व विस्तार | ९ |
| ३ | दुमाला म्हणजे काय, त्याच्या जाती किती, व त्याचा उपभोग कोणते लोक घेतात या जबद्दल | २४ |
| ४ | दुमाल्यांची परंपरागत काय दशा व स्थिति होती, व त्यांत फेरफार कसकसे झाले | ३१ |
| ५ | सरंजामाचे नियम | ३८ |
| ६ | दफ्तर प्रकरण | ४५ |
| ७ | इनामकमिशनचें कोर्ट व त्यांत काम चालतें त्याची पद्धत | ६६ |
| ८ | दत्तक प्रकरण | ७८ |
| ९ | लोकांची समजूत | १२० |
| १० | सरकारचा उद्देश | १२३ |
| ११ | पुरवणी | १२७ |
| १२ | शेवटील बिनाअंक १ | १३७ |

## इनामकमिशनखात्याची उत्पत्ति व विस्तार..(१)

इनामकमिशनखातें प्रतबंदीचे उदरीं निपजलें, म्हणून प्रतबंदीखातें याखात्याची माता होय; व उत्पन्न कर्त्ता मेहेरबान गोल्डस्मिड साहेब होता, म्हणून तो त्याखात्याचा पिता होय. सुमारें १६ वर्षांमागें म्हणजे सन्न १८४२ इसवीचे सुमारास करनाटकांत धारवाडजिल्ह्यांत प्रतबंदी सुरू होती, व तीवरील मुख्य अधिकारी म्हणजे सुपरिंटेंडेंट मेहेरबान मयत गोल्डस्मिड साहेब हे होते. साहेब मजकूर यांचे नजरेस असें आलें कीं, या प्रांतीं दुमाला वगैरे फार असून बहुतेक विनआधारी चालत आहे. जे दुमाले चालत आहेत ते गांवकऱ्यांच्या दुर्लक्षतेनें चालत आहेत; कोणास सनदपत्र वगैरे कांहीं एक नाहीं. दुमालदार लोकांनीं जिकडून साधेल तिकडून आपआपलीं उत्पन्नें साधलीं आहेत. साहेबबाहादूर यांचा मनाचा ग्रह असा झाल्यावर त्यांणीं सरकारास लिहून अशा

पोकळ दुमाल्याची चौकशी करण्याविशीं हुकूम आणविला. सरकार हुकुमाअन्वयें चौकशी सुरू करून मेहेरबान रावबाहादूर मोरोपंत तात्या मेनूसिपाल सदर अमीन यांसही मदतीस पुण्याहून नेलें कांहीं गांवची चौकशी होऊन दोन चार गांव अगदीं गफलतीनें लोक खात होते ते खालसा करण्याचा ठराव केला. पुनरपि सरकारास त्यांणीं असें लिहिलें कीं, या करनाटक प्रांतीं दुमाल्याची बेरीज फार दिसते; सबब यांची चौकशी चांगले रीतीनें झाल्यास सरकारास नफा होईल. ही सूचना सरकारास पसंद पडली आणि मोरोपंत तात्या व गोल्डस्मिड साहेब यांचे मदतीस मेहेरबान हार्ट साहेब यांस नेमून, त्रिवर्गांची कमिटी दुमाल्याचे चौकशीकरितां स्थापली त्यावेळेपासून या खात्यास इनामकमिटी हें नांव झालें ती कमिटी फार दिवस नांदली नाहीं. मेहेरबान गोल्डस्मिड

साहेब निघून गेले, व मोरोपंततात्याही कांहीं ए-
की कारणानें पुण्यास परत आले. सन्न १८४४
पासून कमिटीचें काम मेहेरबान हार्ट साहेब हे ए-
कटेच करीत होते. पुढें त्यांचे मदतीस कप्तान गा-
र्डन साहेब रूमारें सन्न १८५७ साली दिले, व पुढें
दिवसें दिवस या खात्यांत असिस्टंटांची संख्या वा-
ढतच गेली.

हें खातें करनाटकांत मूळ उत्पन्न होण्यास
कारणें झालीं, त्यांपैकीं कांहीं एथें लिहिणें जरूर
आहे. ज्या वेळेस करनाटकांत प्रथम इंग्रजांचा
अंमल बसला, त्या वेळेस इंग्रेजांपैकीं कोणी चां-
गले मुत्सद्दी तिकडे होते. पैकीं एकानें असें मत लि-
हून ठेविलें आहे कीं, या प्रांतीं दुमाल्याची तर अति-
शय वृद्धि झालीशी दिसते. हल्लीं सरासरी चौकशी
करून, सर्व दुमाले चालविले आहेत, प-
रंतु देशांत स्वस्थता व अंमल चांगले रीतीनें बस-

त्यावर सदर्हू दुमाल्याची निश्चुण चौकशी करावी, हें एक कारण आहे. करनाटकप्रांतांत टिपुसुलतानाचे बापापासून दंग्यास वगैरे आरंभ झाला, तो इंग्रजांचा अमल होईतों पर्यंत कायमच होता त्या मुलखांत स्वस्थता बहुत दिवस नव्हती, त्यायोगानें येत्यानें यावें, व जात्यानें जावें, अशी मुलखाची स्थिति होती; यामुळें जमीदार वगैरे लोक हावे तसे वागत असत. जशी ज्यास संधि फावली, तसें त्यानें आपलें हित करून घेतलें; यामुळें दुमाल्याची बेरीज करनाटकांत फार झाली, हें दुसरें कारण आहे. तिसरें कारण असें आहेकीं, सांप्रतचे राज्याधिकारी माजी राज्यांप्रमाणें भोळे नाहींत, आपले नफ्यानुकसानांस फार दक्ष आहेत, व त्यांणीं व्यापार करून हें राज्य संपादन केलें आहे.

सन्न १८५०।५१ इसवी पर्यंत मेहेरबान हार्टसाहेब व त्यांचे हाताखालील मदत करणारे लोक

दुमाल्यांची चौकशी करनाटकप्रांतीं करीत होते, त्यावेळेस कायदाकानू वगैरे कांहीं नव्हता ते समयीं कामाची पद्धत अशी होती कीं, प्रत्येक दुमाल्याची चौकशी साहेब मजकूर यांणीं करून आपल्या अभिप्रायासह सरकारास लिहावें, नंतर हुकूम आणून पक्का ठराव करावा. मेहेरबान गोल्डस्मिड साहेब सरकारचे सकदतार होते, म्हणून सरकारास असलीं विकट कामें समजण्यास व त्यांचा उलगडा होण्यास कांहीं जिकीर पडत नसे सरकारास लोभ उत्पन्न होऊन असें वाटूं लागलें कीं, एकादा कायदा करून सर्व मुंबई इलाख्यांत चौकशी सुरू करावी, व असें केल्यानें या कामास हल्लीं जो चोरटेपणा आहे, त्याचा लोप होऊन न्यायाचें स्वरूप येईल, या इराद्यानें मेहेरबान हार्टसाहेब यांस एक कायद्याचा मसुदा करण्यास फर्माविलें त्यांणीं मसुदा करून पाठविला त्यांत मुंबई-

सरकारानें कमजास्त करून कलकत्यास पा-
ठविला तिकडून मसुदा बहाल होऊन कायद्याचा
मसुदा म्हणून सरकारी पत्रांत चालीप्रमाणें इंग्र-
जींत प्रथम छापला ज्या विषयावर तो मसुदा
झाला तो विषय फार थोडे लोकांस समजण्या-
साखा होता, म्हणजे ज्याची त्या कामाशीं फार
संलग्नता असे त्यासच समजला, पण त्या उदार
लोकांनीं तीं संधी नजाऊं देतां सर्व लोकांस तो
विषय कळण्याविषयीं भगीरथ प्रयत्न केला. अ-
शा उदार लोकांचे उपकार या लोकांवर झाले आ-
हेत, म्हणून लोकांनीं त्यांचा आभार मानावा, हें
योग्य होय

पुण्यात या मसुद्याबद्दल बराच गवगवा झा-
ला. संभावित लोकांनीं कायद्यांत कांहीं फेरफार
करण्याविषयीं सरकारास आर्ज केला. त्याचा जबा-
ब कांहीं एक विचार न होतां सरासरी पानावर पान

ठेवून रयतेस दिला. सरकारास असें वाटलें कीं, ह्या कामांत लोकांनीं उचल केली, व काय द्याचा अद्याप मसुदाच आहे, व इतर मसुद्याप्रमाणें या कायद्याच्या छापण्याच्या दोन तीन आवृत्ती करूं म्हटलें, तर विलंब बहुत होईल. म्हणून लागलाच एकदम कायदा म्हणून छापलें. या विलक्षण वर्तणुकेबद्दल इंग्रेजी वर्तमान पत्रांत वादविवाद चालला असता, पण ज्या प्रकरणांत कायदा झाला त्याचें ज्ञान वर्तमानपत्रकर्त्ते यांस मुळींच नव्हतें, म्हणून त्यांणीं आपले लेखणीस व अकलेस तसदी दिलीनाहीं

सन्न १८५२ इसवी मध्यें इनाम चौकशीबद्दल कायदा ११ ठरला. नंतर मेहेरबान हार्टसाहेब यांस इनामकमिशानर प्रसिद्ध रीतीनें सरकारानें नेमलें. ह्या नारवालीं मदत करणारे साहेब लोक सुमारें पांच असामी नेमिले. हे सर्व इनाम चौकसनीस प्रथमतः बेळगांवाला होते नंतर जिल्ह्या-

निहाय त्यांच्या नेमणुका थोडेच दिवसांत झाल्या. सोलापूर, पुणें, नगर, व सातारा या जिल्ह्यांत जिल्ह्यांचे नांवाचे अनुक्रमानें चौकशीचीं जाळीं लावलीं. जेथें जाळें बसण्यास कांहीं हरकती झाल्या त्या दूर केल्या. या प्रमाणें मेहेरबान हार्ट साहेब यांणीं कामाचा फैलाव जिल्ह्यांतून केला, व काम चालविण्यास हरकत येणार नाहीं. व मदत करणारे लोकही कोणतेही कामांत कचरणार नाहींत, याचा पक्का भरंवसा साहेबमहस्रफयांस आला, आणि ते रजा घेऊन विलायतेस गेले. त्यांचे मागें मदत करणारांपैकीं पहिले नंबरचे मेहेरबान मयतम्यानसनूसाहेब यांस सरकारानें हार्टसाहेब यांचे जाग्यावर मुख्य इनामकमिशनर नेमिलें

हार्टसाहेब यांचे कारकिर्दीत ज्या मुख्य मुख्य गोष्टी झाल्या त्या थोडक्यांत लिहून या खात्यांत

त्यांनीं जी अक्कल खर्च केली तिनक्यापुरतें श्रेय त्यांस देणें योग्य आहे. साहेबबाहादूर यांणीं आ-टोकाट अक्कल खर्च करून काय घाचा मसूदा केला. बेळगांव व धारवाड हे दोन जिल्हे खेरीज करून पुणें, नगर, सोलापूर वगैरे जिल्ह्यांत दुमाल्याचे चौकशीची सुरवात केली. साहेब म-हसूफ यांणीं मेहेरबान येलिस साहेबासारखे उदार नजरेनें कांहीं चमत्कारिक ठराव अगर फैसल्ले केले असे कोठें आढळत नाहीं. सरकार नफ्यावर विशेषंकरून चांगली नजर साहेबां-ची चालत असे ताब्यांतील नौकर लोकांपैकीं हाफूक्यास्ट लोकांवर विशेषंकरून प्रीति व वि-श्वास होता. इतर जातीवर खरेपणाचा संशय होता, यामुळें फक्त हाफूक्यास्ट लोकांचेंच कल्या-ण झालें मेहेरबान म्यानसन साहेब इनामकमि-शनचे आसनावर बसल्यादिवसापासून काम

फार झपाट्यानें न चालतां चाली अन्वयें चालत होतें, व तें आसन त्यास फार थोडे दिवस पचलें; म्हणोन त्यांचे कार्कीर्दीचा कांहीं लिहिण्या सारखा चमत्कार ऐकण्यांत आला नाहीं. हट साहेब यांचे हाताखालचे मदत करणारे लोकांत कप्तान कौपर साहेब (हाल्लींचे दुमाला रेविन्यु कमिशनर) या नावाचा एक आसिस्टंट होता. कपतान कौपर साहेब या खात्यांत शिरल्या वेळेपासून ते आपले लेखणीचे जोरानें चोहीं कडे गर्जूं लागले, व केवळ आपले जातीचे हुशारीवर हाल्लींचे पदवीस आले. हटसाहेब इनाम कमिशनर असतां हे साहेब त्यांचे हाताखालीं एक मदत करणारे होते, तेव्हांच त्यांणीं पुण्याचे एजंटाचे खात्यास कांम टाकून ठेविला होता त्यास हिसके प्रसंगानुसार जसजसे बसत गेले तसतसें त्या खात्यास तेज चढूं लागलें व साहेब मजकूर यांची योग्यता व अक्कल हीं सर्व

कार पर्यंत बहुतरीतीनें महशूर झाली. तो फांस स
रदार लोकाचे एजंटाचे हातून निघण्याची आशा -
फार थोडीच होती तथापि मेहेरबान अनगाबल वा-
र्डिन साहेब तो काढण्यास यत्न करीत होते; परंतु
तो त्यांचा यत्न सफळ झाला नाहीं. या खात्यास त्याका
मांत उलटा जोर आला व घातलेला फांस कारागर
झाल्याशिवाय एजंटीचे खात्यास सोडीत नाहीं अशी
खात्री झाली.

पुढें कपतान कीपर साहेब यांस सरकारानें मु-
ख्य इनाम कमिशनर नेमिले, व म्यानसन् साहेब पू-
र्वींचे इनाम कमिशनर होतेच, या दोघात जिल्हे वां-
टून दिले. नंतर थोडे दिवसानी एक जुने कंपी कपता-
न गार्डन यानावाचे साहेब हट साहेब यांचे हाताखा-
लील मदत करणारी मंडळीचे आरवाडयांत होते त्यां-
स या खात्यात दक्षिणभाग इनामकमिशनर नेमून
मेहेरबान म्यानसन साहेब यांस साताऱ्यास स्पेशल

कमिशनर नेमिले. काही काळ पर्यंत उत्तरभाग इ-
नाम कमिशनर व दक्षिणभाग इनाम कमिशनर व
सातारा स्पेशल कमिशनर हे त्रिवर्ग अधिकारी आप-
आपली कामें चालवीत असतां मेहेरबान कपतान
कोपरसाहेब यांणी नेटीव लोकांचीं नशीबें उदयास
आणली. जे नेटिव लोक साहेब बाहादूर यांच्या हुशारी
वरवेरपणाचे दिन्यास टिकले त्यांस सब आसिस्टणाच्या
जागा दिल्या आणि येथ पासून या खात्याचा विस्ता
र होण्यास आरंभ झाला. मेहेरबान म्यानसन साहेब
विलायतेस रजा घेऊन गेले. त्यांचे जाग्यावर कोंपर
साहेब यांस स्पेशल कमिशनर नेमिले, व कोपर
साहेबांचे जाग्यावर ग्रीफीथ साहेब यास नेमिलें.
कोपर साहेब यांचें रहाण्याचें ठिकाण हुद्या प्रमाणें
सातारा होतें, पण काहीं कामा करतां साताऱ्यास नजा
तां ते मुंबइस जाऊन राहिले. मुंबईत साहेब बाहा
दूर सरकार सन्निध असल्या मुळें जें म्हणत अगरलि

हीत त्या प्रमाणें सरकारचा रुकार मिळूं लागला. असा काल प्राप्त झालासा पाहून एजंटीचे खात्यास अखेरचा झटका दिला. खातें धुळीस मिळालें. साहेब बहादूर स्पेशल कमिशनर असतां दुमाला खात्याचे विस्तारानें निमें मुंबई इलाखा व्यापला गेला— कोंकण व गुजराथ या दोन प्रांतांत ५२ व्या अकराचा कायदा लागू होईना, तेव्हां स्पेशल ड्यूटी या नावानें गुजराथ प्रांतीं दुमाल्याची चौकशी करावी म्हणोन साहेब महसूफ यांनीं सरकारांत सूचविलें सरकार आज्ञेवरून गुजराथ प्रांतीं या खात्याचें एक कमल लाविलें. त्याचा विस्तार ही इनाम कमिशनर व आसिस्टंट व सब आसिस्टंट पर्यंत झाला व फैसल्यावयास ही आरंभ झाला असेल एवढ्यात साहेब बाहादूर याणीं नेटिव लोकांस आणखी एक पाहिरीस चढवून आसिस्टंट केलें. या प्रमाणें त्या खात्याचा व्याप चोहों कडे झाला. आणि सरकारानें या खात्यावर नजर ठेविण्या-

चे वगैरे कामास कपतान कौपर साहेब यांस दुमाला रेविन्यु कमिशनर नेमिलें. याठिकाणीं याखात्याचे वृद्धीची सीमा झाली. व मजबूत पायावर याखात्याची इमारत झाली आहे. काल दशोनें लयास जाईल तर जावो. पण फिर कोळ झपाट्यानें या इमारतीस धक्का अगर वाळवी लागणार नाहीं. असा पक्का इतबार आल्यावर कपतान साहेब एक वर्षाची रजा घेऊन विलायतेस गेले. त्यांचे मागें मेहेरबान एलिस्साहेब यांनीं तें काम चालविलें. त्यांचे कार्कीर्दीत पुष्कळ ठराव चमत्कारिक झाले व त्या ठरावां पासून दक्षिण, गुजराथ व कर्नाटक या प्रांतीं फारच आनंद झाला.

हें खातें मूळ गोल्डस्मिड साहेबानें उत्पन्न केलें, सबब त्याबद्दल मान व यश हीं त्यांस दिलीं पाहिजेत. हार्ट साहेब यांनीं कायद्याचा मसुदा करून खात्याचे पल्लव बरेच पसरून दिले याचें श्रेय त्यांस दिलें पाहिजे, व कपतान कौपर साहेब त्यांनीं नेटीव लोकांस जी स्थिति-

सांप्रतचे राज्यांत कधीं स्वप्नांत देखील या वर्षाची नाहीं तीत आणून ठेविलें, सबब त्यांचें यादेशावर व लोकांवर उपकार समजले पाहिजेत व त्यांची कीर्त्तिही बहुत दिवस राहील.

कपतान कोपर साहेब सांप्रतचे स्थितीस आले हे आपले हुशारीनेंच आले यांत संशय नाहीं; पण दुसरीं कारणें यांचे उदयास कारणभूत झालीं तीं लिहिलीं पाहिजेत. साहेब बाहादूर यांणीं नेटीव लोकांचे मदतीनें व स्वतः चे तर्कानें अनेक मराठी शब्दांचे तन्हेवाईक अर्थ काढले. एजंटाचे खाम्खास रमानतकारस घातलें; व दत्तक प्रकर्णांत फार अक्कल खर्च करून व मेहेनत घेऊन दत्तक देण्याची व न देण्याची मालकी सरकारची आहे म्हणोन मार्जार ज्यांतलीं उदाहरणें काढून सरकारची खात्री केली; इत्यादि कारणांवरून साहेब बाहादूर यांस हालींचें पद मिळालें असावें असें वाटतें.

## दुमाला म्हणजे काय, त्याच्याजातिकिती, वत्याचाउपभोगकोणत्तेरीतीनें घेतात याजबद्दल

दुमाला हा शब्द फारशी भाषेंतील दुम या शब्दा पासून उत्पन्न झाला आहे. दुम म्हणजे शेपूट वत्यास जें काहीं लटकरून रहातें त्यास दुमाला असें म्हणतात. या शब्दाची मूळउत्पत्ति व अर्थ पहातां सांप्रत याशब्दाचा अर्थ याच्यामूळ अर्थापासून फारभिन्न आहे. हाल्लीं दुमाला या शब्दाचा अर्थ असा होतो कीं, गांव वजमीन वगैरे सरकार खालसातीकडे नसोन, लोकांकडे परभारें माफीनें चालतातत्यास दुमाला म्हणतात. या देशांत दुमाल्याची वहिवाट पुरातन पासून चालत आहे असें दिसतें कारण सांप्रतचे राज्याधिकारी यांनीं पुष्कळ शोध करून जुनाटलेख जमवून त्यांची भाषालाबून इंग्रेजींत तर्जुमे केले आहेत. ते तर्जुमे पहातां

कितीएक जमीनीच्या सनदा सुमारें दोन हजार वर्षें पर्यंत जुन्या आढळतात. सांप्रतचे राजे यांचे अगोद र मोंगल व मराठे अशा दोन राज्यांच्यापिढ्याझाल्या त्या दोन्ही कारकीर्दींत दुमाल्यांच्या जाति फार वाढल्या, व त्या प्रांतांप्रांतांतून निरनिराळ्या आहेत त्या सर्व ठाऊक नाहींत, परंतु ज्या ऐकण्यांत आल्या त्यांचे प्रत्येकीचे अर्थ सहित उपभोग घेणारे लोक कोण याचा तपशील प्रांतवार खालीं लिहिल्या प्रमाणें.

काळीच्या दुमाल्यांचीं नावें व ते वहिवाटण्या- चीरीति.

१ इनाम. २ सरंजाम. ३ इसाफत. ४ अग्रहार.
५ पासोडी. ६ हाडवळा. ७ खैरात. ८ बालपरवर्षी.
९ नानपरवर्षी. १० सरदेशमुखी. ११ चौथाई. १२ जाहागीर.
१३ मोकासा. १४ साहोत्रा. १५ वेचणी. १६ गिरासी.
१७ पसाइत. १८ चाकराइत. १९ बर्जीफा. २० गिरास.
२१ सौंदीया २२ वांटा

## नक्तीचे दुमाले.

१ वर्षासनें　२ नेमणूक　३ रोजिना

वर लिहिलेले प्रकार व जाति त्या दुमाल्यांतील मुख्य मुख्य आहेत. त्यांशिवाय आणखी पुष्कळ आहेत, परंतु, त्यांची येथें लिहिण्याची जरूर दिसत नाहीं, सबब लिहिल्या नाहींत. नंबर १५ पासून २२ पर्यंत जीं नावें आम्ही लिहिली आहेत ते दुमाले गुजराथ प्रांतांत आहेत, बाकी राहिलेले दक्षिणेंत व करनाटक व कोंकण इत्यादि प्रांतांत आहेत. असें एकण्यांत आहे. पैकीं कोंकण व गुजराथ त्या दोन प्रांतीं हा कायदा लागू नसून दुसरे कोणते नेमानें सरकार फैसल करीत आहे याची प्रसिद्धि नाहीं. या मुळें त्या दोन प्रांतांबद्दल लिहिणें वाजवी नाहीं. बाकी करनाटक व दक्षिण त्या दोन प्रांतांत हा कायदा लागू आहे तर त्या दोन प्रांतां विषयीं लिहिणें जरूर आहे

## दक्षिण व करनाटक त्यांतील दुमाल्याचें वर्णन

[illegible]

१ इनाम, हाशब्द फारशी भाषेंतील आहे. कांहीं वस्तु एकानें दुसऱ्यास बक्षीस देणें त्यास इनाम म्हणतात. इनाम दिल्हेल्या वस्तूवर देणाराचा कोणत्याही प्रकारें कांहीं ही हक्क चालत नाहीं. ही देणगी हिंदु, मुसलमान वगैरे लोकांस दिल्हेली असते.

२ कोणी मनुष्य सरदार अगर शिलेदार अगर मुत्सद्दी असेल त्याचे फौजेचे व जातीचे निर्वाहासाठीं गांव व जमीनी वगैरे सर्व मिळून सरकारांतून दिल्हें असतें, त्या उत्पन्नाचे एकंदर जुमल्यास सरंजाम असें नाव आहे. यापैकीं फौजेचे निर्वाहार्थ जे वढा उत्पन्नाचा भाग दिल्हा असतो त्यास फौजसरंजाम असें म्हणतात. व जे वढा उत्पन्नाचा भाग शिलेदाराचे अगर सरदाराचे अगर मुत्सद्याचे जातीचे निर्वाहार्थ दिल्हा असतो त्यास जातसरंजाम म्हणतात. सदर हू दुमाला वरलिहिलेले लोकांखेरीज इतर क्षुल्लक लोकांस नसतो.

इसाफत, म्हणजे जास्ती, व हाशब्द फारशी भाषें-

नीलच असावा असें वाटतें ह्या दुमाला बहुत करून प्रांताचे जमीदार म्हणजे देशमूख व देशपांडे वगैरे जमीदार लोकांत आढळतो. इतर लोकांत ह्या दुमाला असत नाहीं.

४ अग्रहार एक कुटुंबाहून जाजती कुटुंबांस निर्वहार्थ जोगांव अगर जमीन देतात त्या देण्यास आग्रहार म्हणतात.

५ पासोडी म्हणजे गांवचे पाटलास चाकरी बद्दल खाण्यास दिलेली जमीन.

६ हाडवळा म्हणजे महार लोकांस गांवची चाकरी पडते त्या बद्दल दिल्हेली जमीन.

७ खैरात म्हणजे मुसलमान लोकांचे दर्गे पीर व मसीदी यांचे खर्चा बद्दल दिल्हेला गांव अगर जमीन.

८ कोणी शिलेदार अगर सरदार लढाईत अगर सरकार कामावर मयत झाला असतां त्याची लहान मुलें असल्यास त्यांचे निर्वहा करतां गांव व जमीन वगैरे

जी देणगी दिली असते तीस बाळपरवर्षा असें म्हण-
तात.

९ शिलेदार अगर सरदार लढाईंत अगर सरकार
कामावर मेला आणि त्यास वंश नसून फक्त त्याचे बा-
यकांचे निर्वहार्थ जें गांवव जमीनी वगैरे देतात त्या दे-
णगीस नानपर वर्षा असें म्हणतात

१० मोंगलांनीं प्रांताचे अगर गांवाचे एकंदर कमाल
वेर्जेवर (तनख्यावर) दरशेंकडा दहा किंवा सा-
डेबारा रुपये प्रमाणें पट्टी नवी बसविली तीशिवाजी
स दिल्ही तीस सरदेशमुखी म्हणतात.

११. वरची पट्टी खेरीज करून मोंगलांनीं एकंदर व-
सुला पैकीं चार आणे मराठयांस दिले त्यांचें नाव मों-
गलांनीं चौथ असें ठेविलें व त्या चोथाईस अगर चतु-
र्थांशास मराठे लोक स्वराज्य म्हणत असत.

१२ मोंगलांनीं चार आणे मराठ्यांस दिल्यावर त्यां-
चे गांवांत अगर परगण्यांत बारा आणे राहिले त्यांस

जाहागीर म्हणतात.

१३ वरील चौथाईचें म्हणजे स्वराज्याचे मराठे लोकां-
नीं दोन भाग केले, पैकीं तीन आण्याचा भाग, एक त्या-
चें नाव मोकासा, व एक आण्याचा भाग त्याचें नाव सा-
होत्रा ठेविलें.

१४ दरशेकडा साहा रूपये प्रमाणें पट्टी आहे अगर
कोठे जास्ती ही असेल तीस साहोत्रा म्हणतात

अ- सरदेशमुखी, जाहागीर, चौथ, मोकासा, व साहो-
त्रा; इतक्या वांटण्या दर एक गांवात व प्रांतांत होऊं ला-
गल्या व प्रत्येक वांट्यास जो वसूलाचा भाग ये ई, त्या-
स अंमल असें नांव झालें.

ब- देवस्थान व धर्मादाव म्हणून दोन प्रकार आ-
हेत, त्यांत जी देवाचे खर्चा बद्दल देणगी दिल्ही अस-
ते तीस देवस्थान असें म्हणतात; व जी देणगी गरीब
ब्राम्हण वगैरेस दिली असते तीस धर्मादाव म्हणतात.
त्या दोन्ही जातींच्या देणग्यांस चाकरी नाहीं.

नक्तीकडील दुमाले

१ धान्य अगर नक्त जें वर्षास कोणी एका मनुष्यास एकदां पावतें त्याज बद्दल त्यास चाकरी करावी लागत नाहीं, अशा प्रकारचे देणगीस वर्षासन म्हणतात ही देणगी बहुधा ब्राम्हण लोकांत आढळते.

२ नेमणूक म्हणजे सालीना जें नक्त वगैरे पावतें, त्या देणगीस नेमणूक म्हणतात. त्या बद्दल कोणास चाकरी असते कोणास नसते.

३ नक्त अगर गल्ला दरगेज कोणतें पावतें त्यास रोजीना म्हणतात. त्या बद्दल चाकरी करावी लागत नाहीं.

वर लिहिलेल्या देणग्यांचे दोन वर्ग होतात; एक चाकरी बद्दल देणगीचा, व दुसरा चाकरीखेरीज देणगीचा.

## दुमाल्याची परंपरागत काय दशा व स्थिति होती व त्यांत फेरफार कस कसे झाले.

मोंगलांच्या व हिंदूंच्या धर्मांचा अति निकट द्वेष होता. व मोंगलांनीं कित्येक हिंदूंचीं देवालयें छिन्न.

भिन्न केली तथापि हिंदूंचे देवांस व ब्राम्हण वगैरे लोकां-
स जे दुमाले होते ते पूर्ववत् प्रमाणें चालविले; व नवीन
ही या हिंदुलोकांत पुष्कळ देणी दिल्हेली आहेत. मोंगला-
ईराज्याचा लय झाल्या वर पुढें मराठे लोकांचें राज्य झा-
लें. त्यांणी मोंगलांची देणी चालवून नवीन ही फारदि-
ल्हीं. शिवाजी पासून सवाई माधवराव यांचे अखेर प-
र्यंत दुमाल्याची वृद्धिफार झाली. सदरहू रदींत चाकरी
बद्दल व चाकरी खेरीज किती याचें मान पाहूं लागल्यास
असें आढळतें कीं, सर्वराज्यांतील दुमाल्यांचा बेरीज
एकरुपया आहे असें कल्पिल्यास त्या पैकीं पंधरा आणे
चाकरी बद्दल लोकांस दिल्हेले होते. बाकी एक आणा
चाकरी खेरीज म्हणजे फुकट खाणारे लोकांस दिल्हा हो-
ता असें दिसतें. बाजीराव रघुनाथ गादी वर बसल्या पासू-
न वरील मान अगदीं बिघडून गेलें. बाजीरावास धन-
लोभ अतिशय होऊन चाकरीचे लोकांचीं उसन्नें सर्व स-
रकारांत घेतलीं. यामुळें सर्व सरदार व शिलेदार लोक आ-

प आपले घरीं बसले. कांहीं जें उत्पन्न बाजीरावानें चालविलें तें त्याच्या राज्याचे गोंधळानें व भोळेराईनें यथास्थित निर्बंध चाललें नाहीं. त्याचे कारकीर्दींत मामलती लिलांव करून मामलेदारांस देत असत, म्हणून मामलेदारांस सरकारची तुंबडी भरण्यावर नजर ठेवावी लागे. याजमुळें दुमालदार व रयत सर्वस्वी नागवली जाई. मामलेदारांनी रोकडीशिवाय दुसरा कांहीं हिशेब राखिला नाहीं; याजमुळें कांहीं गांव व जमीनी चालल्या, कांहीं न चालल्या. वर्षासनदार लोकांतून कोणास पैसा मिळाला, कोणास न मिळाला, अशी धांदल बाजीरावाचे कारकीर्दे सुरू होऊन अखेर होईतोंपर्यंत होत आली.

इंग्रेजी अंमल पुढें झाला, त्यांनीं असें मान ठरविलें कीं, जें कांहीं लढाई अखेर चालत आलें असेल तें लोकांकडे चालविलें जाईल. यामानानें सर्व दुमाल्याच्या तात्रिक चौकशा होऊन, ज्याचें त्यास चालविलें, व न बानदेणेंही तुरळूक तुरळूक दिल्हें. या देशांत इंग्रेजांच्या

अंमल बसून स्वस्थता व्हावी म्हणोन इंग्रजांनीं ते समयीं कर्णाच्या अवतारा प्रमाणें औदार्य धारण केलें होतें. सातारकर महाराज बहुत दिवस पेशव्यांनीं बंदींत ठेविले होते त्यांची मुकता करून त्यांस चौदा लक्षांचा मुलूख दिला आणि तें राज्य पेशव्यांचे ठ्या बरोबरच उभारिलें. लोकांस ही पेशवाई बुडाली नाहीं असें भासविलें. बाजीरावानें जुने सरदार यांचीं उत्पन्नें जप्त करून घरीं बसविले होते त्यासरदार लोकांस सरकारानें त्यांचीं पूर्ववत् उत्पन्नें कांहीं कमजास्त करून त्यांजकडे चालतीं केलीं आणि ते सरदारलोक जागचे जागीं राखिले. अशी इंग्रज सरकारानें उदार नजर केल्यावरून लोकांस इतका आनंद झाला कीं, सांप्रतच्या राज्या प्रमाणें राज्य होणारच नाहीं असें म्हणूं लागले. लोकांनीं ते समयीं, "घो बघीतली पण बडगा बघीतला नव्हता," तो आतां आला आहे.

सरंजाम खेरीज करून बाकी दुमाल्याची चाळणी प्रसंगा नुसार कलेक्टर कडून अचल इंग्रजी पासून-

सन १८५२. पर्यंत होत गेली.

सरंजामाची व्यवस्था पाहूं लागलें असतां त्याची उलटा पालट बहुत वेळा झाली. अव्वल इंग्रेजीस मेहेरबान आलपिस्टन साहेब यांणीं दक्षिणेंतील सर्व सरंजामांचा पट तयार करून कलकत्ते सरकाराकडे पाठिवला. ते समयीं मुंबई सरकारचें मोठेंसें महत्व नव्हतें म्हणोन कलकत्ता हें मुख्य राज कारणाचें स्थान या देशाला होतें. तो पट सरकारांतून पसंत होऊन आला ते वेळेस सरंजामांची एकंदर बेरीज वसातारकर राजें यांस दिल्हेल्या मुलखाची बेरीज व इतरूकिरकोळ दुमाल्यांची बेरीज अशा तिन्ही बेरजा करून अंजमासें पाहिल्या तर त्या वेळेस कंपनी सरकारास पेशव्यांचा मुलूख घेऊन कांहीं नफा न होतां उलटें नुकसानच झालें असेल असें वाटतें. या देशांत अंमल सुयंत्र बसविण्याचा होता, व लोकांस गनगज्याचें स्मरण होऊं नये एतदर्थ सरकारास उगीच बख्-

णें अवश्य झालें. असें सांगतात कीं, ते समयीं सर-कारानें मेहेरबान आल्पिस्टन साहेब यांस असें वि-चारिलें कीं, तुम्ही इतका दुमाला लोकांस दिला हें काय? त्यांणीं जबाब असा दिला कीं, या देशांत हाली आहे, व सां-प्रतचा प्रसंग असा आहे कीं, असें औदार्य केल्याशि-वाय दुसरा उपाय नाहीं, परंतु कालयोगानें हें सर्व सर-कारांत येईल, असा पाया घातला आहे.

दुसरा सरंजामाचा पट मेहेरबान चापलीन् सा-हेब यांनीं संन १८२२ सांत केला; व तिसरा म्यारीट सा-हेब यांनीं केला; व चौथा मिल साहेब यांनीं सन १८३४ सांत केला. या प्रमाणें इंग्रजी अंमल बसल्या पासून सोळा वर्षांत चार वेळ सरंजामाची तपासणी झाली.

सन १८१८ पासून संन १८३४ पर्यंत इंग्रज स-रकारचा अंमल बसून बराच काळ झाला. दरम्यान स-रंजामदार लोक गयत मयत होन गेले. वारसाकडे सरं-जाम चालविणें न चालविणें विषयीं सरकारास नेहेमीं

तसदी पडूं लागली. मुंबई कौन्सिलांतून जे हेमीं ठराव एकसारखी प्रकरणें असतां तत्रापि निरनिराळे होऊं लागले. कांहीं एक उसन्न निर्णय चालविण्याचा अधिकार मुंबईसरकारचे हातीं राहिला नाहीं. सरंजामाचे प्रकरणांतकोर्टआफ्‌डरेक्टरांकडे लिहिल्याशिवाय निकाल होईनासा झाला.

विलायतेंत कोर्टआफ्‌डरेक्टर यानावाची हिंदुस्थानचा कारभार पाहाण्यास एक कमिटी आहे, तींतील बहुतेक पंचांनीं हिंदुस्थान पाहिलेलें नसतें. व या देशांतील रिवाजांस ते अनभ्यस्त असतात, यामुळें जीं मुंबई सरकाराकडून सरंजामाचीं प्रकरणें सदरकमिटीचे मंजुरी करतां जात, त्यांचा निकाल व कशीर न होऊन घोंटाळा पडूं लागला. सरते शेवटीं कोर्ट आफ्‌डरेक्टर यांनीं मुंबईसरकारास अशा हुकूम फरमाविला कीं, सरंजामाचीं प्रकरणें तुम्हांकडून वारंवार आम्हांकडे निकालास येतात, तर

असें न होतां दक्षिण प्रांतांतील सर्व सरंजामांचा एकदांच निकाल करून टाकावा असें आमचें मत आहे. तर आम्हीं कांहीं नियम ठरवून पाठवितों त्या अन्वयें तुम्हीं सर्व सरंजामांची चौकशी एकंदर करावी आणि एकदम एक तक्ता करून आम्हांकडे पाठवावा म्हणजे त्या सर्व सरंजामांचा एकदम निकाल करण्यास बरें पडेल. असें ऐकण्यांत आहे कीं, ज्या वेळेस विलायतेंत सरंजामांचे नियम कोर्ट आफ डैरेक्टरस्थांनीं केले त्या वेळेस मेहेरबान आलफिस्टन् साहेब यांचीस दरकामांत मदत घेतली होती.

## सरंजामांचे नियम.

१ जे सरंजाम सन १७५० इसवीचे पूर्वीं संपादन केले असतील ते सर्व वंशपरंपरा चालवावे.

२ सन १७५० इसवी व सन १७९६ यांचे दरम्यान जे दिल्हेले असतील ते दोन पुस्त चालवावे, व तिसरे पुस्तास निम्मे पेनशन द्यावें.

३ सन १७९६ पुढें व सन १८१८ चे दरम्यान जे सरंजाम दिल्हेले असतील ते ताहायात ठरवून पुढील पुस्तास निम्मे पेनशन द्यावें.

सदरील नेमांत विलायतेंतील मजकुरा पेक्षां कांहीं जाजती मजकूर झाला असें ऐकण्यांत आहे. विलायत सरकारांनीं मूळ असें ठरविलें होतें कीं, सन १७५० इसवीचे अगोदरचे जे सरंजाम लोकांकडे चालत असतील ते वंशपरंपरा चालवावे; व त्यास व सरंजामांची पहिली प्रत करावी.

सन १७५० इसवी पुढील जे सरंजाम मिळाले असतील ते दोन पुस्त चालवावे, व तिसरे पुस्तास निम्में पेनशन द्यावें; व या सरंजामांची दुसरी प्रत करावी. वरील नेमा प्रमाणें एखादा सरंजाम मूळ संपादनाचे सालाअन्वयें सदरील प्रतींत घालण्यास अडचण येईल, पण, जर सरंजामदार याचा मोठेपणा अगरजुनें घराणें असेल; अगर तो राज्यकारणांत मोठा उपयोगी पडु-

ला असेल, इत्यादि कारणां वरून मूळसरंजाम मिळा-
ले सालाचा विचार एकीकडे ठेवून तुम्हांस अशासरं-
जामदाराचा सरंजाम अमुक प्रतींत घालावा असें वा-
टेल तर अशा प्रकारच्या सरंजामाची तुम्हींशिफारस
करावी; मग त्याचें मंजूर नामंजूर करणें पाहाण्यास
येईल. इतका मजकूर सरंजाम प्रकरणांत मूळवि-
लायतेंतून सुटला असें ऐकण्यांत आहे. आतांति-
सरी प्रत उत्पन्न झाली कशीयाचा शोध लावतांनां
असें कळतें कीं, कोणीतरी संभावित साहेब लोका-
नें आपल्यास हुशारी मिळावी, व सरकार नफा व्हा-
वा या इराद्यानें यातिसरे प्रतीची कल्पना काढून व
दुसरे प्रतीची हद्द मोघम होतीती शाहाण्णवां पर्यं-
त स्पष्टरीतीनें ठरविली. दुसरे वतिसरे प्रतींत पेन-
शनाचा ठराव आहे, त्यांत पुस्त मोजणें झाल्यास अ-
व्वल इंग्रजीस ज्याचे हातीं सरंजाम होता, त्या पुरुषा-
पासून पुस्त पुढें मोजावे. ज्यानें तिसरी प्रत उत्पन्न

केली. त्यानें ही प्रतनिराळी करण्यास अशीं कारणें लिहिलीं आहेत कीं, "तिसरे प्रतींतील लोक सर्व"
"बाजीरावाचे कार्किर्दीत वाढलेले आहेत, व त्या"
"लोकांस वाढण्यास मोठा पराक्रम अगर देशका-"
"मगिरी करावी लागली असें दिसत नाहीं. केवळ"
"बाजीरावाचे खुशामतीवर हे लोक उदयास आले"
"आहेत, तर अशा लोकांस वरील दोन प्रतींत सामी-"
"ल करावें, हें प्रशस्त नाहीं. दोन प्रतींत जे लोक"
"आहेत, त्यांचे पूर्वजांनीं राज्याची एकनिष्टपणें चा-"
"करी केली आहे, व प्रसंगोपात्त प्रत्येक सरंजामदाराचें"
"पूर्वज दोन किंवा चार देश राखण्यांत ठार झाले"
"आहेत. अशी त्या सरंजामदारांचे पूर्वजांची"
"निष्ठा पाहून, राजांनीं व पेशव्यांनीं सरंजाम दिल्हे"
"ले आहेत. व तिसरे प्रतीची अशी कथा आहे"
"कीं, बाजीरावाचे कार्किर्दींत, शूर लोकांची माती"
"झाली, व फक्त खुशामत करणारे लोक उदयास-"

"आले. त्या लोकांस कोणतें ही काम कितीही नीच अ-"
"सले तरी करण्यास शंका वाटत नसे; अशा प्रकार-"
"च्या लोकांस बाजीरावानें सरंजाम दिले, त्याचा तिसरा"
"वर्ग केला आहे. त्यांत इतकेंच आहे कीं, पराक्रमानें"
"जे लोक थोरपणास चढले; व खुशामती वरच जे लोक"
"मोठे झाले; असे दोन्ही प्रकारचे लोकांस एकमाळेंत"
"ओंविल्यास चांगले लोकांचे अप्रतिष्ठेस कारण हो-"
"ईल." त्या प्रमाणें तिन्ही सरंजामांच्या प्रतींची उत्पत्ति झाली.

सन १८४४ इसवीचे सुमारास वर लिहिल्या अन्वयें दक्षिणेंतील एजंट यांजकडे सर्व सरंजामांची दर्यासी होऊन वर्गवारी करण्यास आरंभ झाला; ते वेळेस दक्षिणेंत एजंट मेहेरबान वार्डिन साहेब होते. त्यांनीं सदरील तिन्ही प्रती कायम केल्या. कांहीं सरंजाम मुळदेण्याच्या तारखे अन्वयें दुसरे अगर तिसरे प्रतींत येण्या सारखे होते, त्या सरंजामदारांच्या शिफारशी करून कांहीं पहिले प्रतींत घालावे, व कांहीं दु-

सरे प्रतींत घालावे. त्याप्रमाणें सरकारास विनंती आसाहेब यांनीं केली. अशारीतीनें दक्षिणेंतील सरंजाम प्रकरण तयार होऊन मेहेरबान एजंट साहेब यांजकडून मुंबई सरकारचे मार्फत विलायतेस कोर्ट आफ् डरेक्टर यांजकडे रवाना झालें. कोर्ट आफ् डरेक्टर त्यांस त्यांत कांहीं संशय आल्यावरून त्यांनीं पुनः तें प्रकरण मुंबई सरकाराकडे परत पाठविलें. नंतर विलायतेंतून जे संशय उत्पन्न झाले त्यांची निवृत्ति होऊन पुनरपि तें प्रकरण विलायतेस सदर हू कमिटी यांजकडेस गेलें. दक्षिणेंतील एजंटानें जी सरंजामांची वर्गवारी केली म्हणजे प्रती लाविल्या, त्या व कांहीं सरंजामांविषयीं एजंटानें शिफारशी लिहिल्या, त्या सर्व कोर्ट आफ् डरेक्टर यांनीं पसंत केल्या; आणि एजंटास मोठी शाबासकी, व त्याचे हाताखालचे लोकांस सरकारांतून बक्षिसें वगैरे मिळालीं.

सरंजामदारलोक त्यांसही एजंटमार्फत विलायतसरकारचे हुकूम ज्यांचे त्यांस कळविण्यांत आले; व लोकांसही असें वाटलें कीं, आमचे सरंजामांची उलथापालथ अम्मल इंग्रजी पासून होत गेली त्याचा अखेर निकाल आज झाला. विलायत सरकारचे सपाट्यांतून आमचे सरंजाम बहाल होऊन माघारे आले तस्मात् आतां आमचे सरंजामांची उचाड पछाड होणार नाहीं.

अशी लोकांस खात्री व भरंवसा पूर्णपणें असतां इनाम कमिशनखात्यांतून सरंजामांची झारेकऱ्या प्रमाणें चौकशी सुरू झाली. कांहीं चुक्या मिघाल्या, त्या एजंटसाहेबांचे गैरसावधपणामुळें व नेटिव लोकांचे दगाबाजीनें झाल्या असें इनाम कमिशनखात्यांतून ठरलें. जे सरंजाम सनदापत्रावरून दुसऱ्या प्रतींत जाण्यासारखे असून, त्या सनदेचे अर्थ भलते भलते करून पहिले प्रतींत

घालें ण्याविषयीं एजंटानें शिफारसी केल्या हें बरो- बर नाहीं; अशा अनेक प्रकारच्या एजंटसाहेबरखां- च्या नालस्त्या सरकारास इनामकमिशन खात्यांतू- ननिवेदन झाल्या; त्या सरकारानें कांहीं शंका नका- ढतां नंदीबैला प्रमाणें ऐकून त्या लोकांच्या माना नि- मूटपणें मोडण्यास तें प्रवृत्त झालें.

## दफ्तर प्रकरण.

माजी कार्कीर्दींत महाल वगैरेचीजी वहिवाट झा- ली, याचे लेख आहेत त्यास दफ्तर म्हणतात. त्या द- फ्तरांत दोन भाग आहेत, एका भागास पेशवे दफ्- तर असें म्हणतात, व दुसरे भागास महालजमीदार वगैरे दफ्तर असें म्हणतात. दफ्तर हें केवळ त्या खात्याचें धर्मशास्त्र आहे; त्याचे अर्थ जशी ज्याची बुद्धि चालते तसतसे निघतात; तर त्या दफ्तरास केवळ कल्पवृक्षाची उपमा दिल्या असत्वां गैर ना- हीं. असें जें हें कल्पवृक्षासारखें दफ्तर तें कोणते-

काळापासून कोणते काळापर्यंत जाळलेलें रेवरीज करून आहे, त्यांत कोणते प्रकारचे कागद आहेत, व त्यांत माहिती कोणते प्रकाची मिळते; व त्यांत जे कागद आहेत ते तयार होण्यास काय नियम होते व कसे तयार होत होते त्याचें वर्णन केल्या शिवाय पुढें लिहिणें ठीक नाहीं. सदरीं दोन भाग दफ़तराचे लिहिले आहेत, त्यांपैकीं अगोदर पेशवे दफ़तराचा इतिहास खालीं लिहिल्या प्रमाणें आहे. त्या पेशवे दफ़तरांत दोन प्रकार आहेत, त्यांत एक हुजूर दफ़तर, व दुसरा महाल दफ़तर. त्यांत हुजूरदफ़तर म्हणजे हुजूर कागद तयार होत असत त्यास म्हणतात. व जे कागद महालांत तयार होत असत त्यास महाल दफ़तर म्हणतात.

१ रोजकीर्द. २ नेमणूकबेहेडा. ३ अजमास.

४ झडती. ५ ताळेबंद. ६ घडणी.

७ तर्जमा. ८ सरंजामयादी. ९ ठरावपत्र.

त्या प्रमाणें पेशवेदफ्तरांत हिशेब आहेत; त्यां शिवाय आणखी पुष्कळ असतील, परंतु मुख्य मुख्य जे कागद होत होते ते लिहिले आहेत. नंबर ४ चा कागद मात्र ठाण्यास तयार व्हावयाचा. बाकीचे सर्व कागद हुजूर तयार होत असतात.

पेशवाईचीं वस्त्रें सन्न १७१४ इसवींत बाळाजी विश्वनाथ यांस शाहूराजानें दिल्हीं. तेथ.पासून पेशवे दफ्तर असावें परंतु नाहीं. सातारकर राजांनीं या मुलखांत राज्य केलें त्याचे लेखही कोठेंच आढळत नाहींत. परंतु, त्या कार्किर्दीचें फार थोडे दफ्तर इनाम कमिशनचे होळकरी दग्यांत मिळालें आहे, म्हणून ऐकण्यांत आहे. सन्न १७१४ इसवी पासून सन १७५० इसवी पर्यंत पेशवे स्वतंत्र वागत नसून राजाचे अष्टप्रधान मंडळी प्रमाणें असत तथापि या दफ्तरांत सन १७२० इसवी पासून सन १८१८ पर्यंत सुमारें शंभर वर्षांचें लिहिणें

आढळतें; त्यांत सन १७५० इसवी पासून सन १७६० इसवी पर्यंत पेशव्यांची भरभर होत गेली; व ते समयीं मुलूखसंपादनावर विशेष नजर होती म्हणून ते वेळेचें लिहिणें चांगलें तपशीलवार नाहीं. सन्न १७६१ इसवींत सोनपत पानपतची लढाई होऊन पेशव्यांचा मोड झाला, तेंव्हा पासून पेशव्यांचा दम खचून दिवसें दिवस राज्यास क्षीणत्व येत गेलें. सन १७६१।६२ इसवी तागायत सन्न १७९६ इसवी पर्यंत स्कमारें पस्तीस वर्षें राज्यकारभार थोरले माधवराव व नानाफडणवीस, त्यां उभयतांनीं चालवून महालचे हिशेब वगैरे चांगले रीतीनें व्हावे म्हणून बंदोबस्त ठेविला होता, परंतु, लिहिण्यास कांहीं नियम व बंद असतील असें सांप्रतचे दफ्तराचे स्थिती वरून वाटत नाहीं. बाजीराव रघुनाथ गादीवर बसल्या पासून थोरले माधवराव व नानाफडणवीस त्यांनीं लि-

हिण्याचा जो कित्ता घातला होता तो अगदीं बद्लून गेला; आणि सर्व लिहिणें बुडून नंबर १ चा कागद विशेष दक्षतेनें तयार होऊं लागला.

वर नऊ प्रकारचे कागद लिहिले, ते कसकसे तयार होत, व त्या प्रत्येकांत कोणते प्रकारची माहिती मिळते त्याचा तपशील.

रोजकीर्द, म्हणजे ज्यांत राज्याची दिनचर्या रोजच्या रोज लिहावयाची त्यास म्हणतात. त्यात नक्तीचा जमाखर्च व हुकुमांची बारनिशी असें तारखेचे तारखेस असतें, पैकीं नक्तीचे जमाखर्चास (खासदंगी) म्हणतात व हुकूम वगैरे जे लेखी होतात त्याचे बारनिशीस (दफाते) म्हणतात.

२ मामलेदार त्यानें दरसाल खर्च किती करावा म्हणजे दुमाले व वर्षासनें व सिबंदी व देवस्थानें वगैरे खर्च कसकसा व कोठ पर्यंत करावा त्या बद्दल हजरून कागद तयार होऊन मामलेदाराकडे-

दरसाल पाठवीत त्यास (नेमणुक बेहेडा) म्हणतात.

३ मामलेदारानें आपले ताब्यांत जो प्रांत आहे त्याचा वसूल कोणते रीतीनें करावा व दर एक गांवची कमाल वगैरेज किती व प्रांतापैकीं दुमाले गाव किती व नक्त खर्च किती याविशीं बंधारण करून जो कागद दरसाल हुजूर तयार होऊन मामलेदाराकडे पाठवीत त्यास (अजमास) म्हणतात.

४ मामलेदारानें हुजुरून नेमणुक बेहेडा व अजमास घेऊन त्या अन्वयें जी सरसाल प्रांताची वहिवाट केली त्या वहिवाटीचा मामलेदार तपशीलवार हिशोब तयार करी त्यास (झडती) म्हणतात.

५ मामलेदारानें सरसाल प्रांताची वहिवाट करून प्रांतांतील कोणीतरी सरकारी कारकुना बरोबर प्रांताचा सरसालचा हिशोब हुजूर मोजण्यास पाठवी नंतर हुजूरचे लोकांनीं त्या प्रांताचे तपशीलवार हिशोबावरून एक थोडक्यांत समजण्या सारिखा गोषवारा करा-

वा त्यास (नालेबंद) म्हणतात.

६ प्रांतवार सरसालीचे जमाबंदीचे वगैरे हिशेब व प्रांतवार सर सालांत जालेले हुकूम याची प्रांतवार खतावणी जी करीत त्यास (घडणी) असें म्हणतात.

७ राज्याचें एकंदर उत्पन्न किती व खर्च किती व फौज किती व खंडण्या किती यावयाच्या वगैरे सर्वप्रकारची माहिती एक कागद हातीं घेतला असतां व्हावी. म्हणून जो हिशेब तयार करीत त्यास (तरजमा) म्हणतात.

८ सरदार व शिलेदार व पागे यांजकडे प्रत्येकास किती गांव व जमीनी वगैरे उत्पन्न फौजेकरितां व जातीकरितां सरकारांतून दिलें असतें त्याची याद असते ती दरसाल तयार व्हावयाची नव्हे प्रसंगानुसार प्रत्येक शिलेदार वगैरेचे नावानें तयार होत असे त्यास (सरंजाम यादी) म्हणतात.

९ ठराव पट म्हणजे मत्स्थानें मामलत कोणी एक

मनुष्यास सांगितली त्याणें सरकारांत साल अखेरीस
किती पैसा किती हपत्यांनीं द्यावा एवढा मुख्यत्वें करून
मजकूर या कागदांत असतो. प्रांतांत दुमाला वगैरे कि-
ती या विशीं माहिती या कागदांत मुळींच नसते. अस-
ल्यास क्वचित आढळते.

सदरीं लिहिले प्रकारचे कागद परगणेवार व प्रांतवार आ
हेत. मौजेवार कचे हिशेब या पेशवे दप्तरांत मुळींच ना
हींत असल्यास पाच पन्नास गांवचे अगर जे असतील
ते संगीन सालवार नसून फार थोडे सालचे असतील.
या मुळें पेशवे दप्तरांत एका गांवची कची हकिकत साल
वार कळेल असा कागद सांपडण्याचा बहुत करून अ-
भावच आहे असें ऐकण्यांत आहे.

सदरीं लिहिले कागदांत जे चमत्कार आहेत ते ए-
थें लिहिल्या शिवाय लेखणी पुढें चालेनाशी झाली सबब
चमत्कार लिहूं लागलें असतां एक निराळा मोठा भारता
एवढा ग्रंथच होईल परंतु तसें करण्यास या लिहिणारा

चे स्वाधीन सर्व दप्तर पाहिजे. ही गोष्ट लिहिणारानें जर विलायतेंत जन्म घेतला असता आणि या देशांत येऊन हें प्रकर्ण तयार करावयाचा छंद घेतला असता तर त्यास हें पेशवे दप्तर वगैरे सर्व साहित्य हवें तसें मिळतें. या साहित्याविशीं लिहिणारा मनुष्य सर्व रीतीनें भिकारी आहे यास उपाय नाहीं परंतु जे कांहीं थोडें मिळालें व ऐकिलें तें सर्व खालीं लिहितों.

ज्या मनुष्याकडे ज्या माहालची अगर परगण्याची मामलत सांगत तो मनुष्य त्या माहालांत व परगण्यांत कधींच जात नव्हता त्यानें आपलें हस्तक त्या माहालास अगर परगण्यास पाठऊन मामलतीची वहिवाट करवावी आणि आपण हावें तिकडे राहावें. साल अखेर माहालचा हिशोब तयार होई त्यावर मूळ ज्या मनुष्याकडे मामलत सांगितली त्याची विद्यमान लागे असें (अखेती परगणे पाथरी विद्यमान नारोकृष्ण सन् १२०१ फसली) हा कागद कोणीही हातीं घेतला अस-

त्यां कोणास ही असें वाटेल कीं नागो कृष्ण हा मनुष्य सबब माल्ली सदर माहालचे ठाण्यांत होता परंतु तो मनुष्य त्या माहाल्लांत जन्मांत कधींच गेला नाहीं

हुजूर तयार होण्याचे कागदांत ताळेबंद वगैरे अत्यं क माहालचे दर एक साल्लास परगणेवार व माहालवार व ताल्लुकेवार तयार होण्याचें असून ते कागद सालांतले साल्लांत तयार होत नव्हते व अमुक दिवशीं अगर अमुक साल्लांत हा कागद तयार झाला असेल असें अनुमान करण्या सारखें फार थोडेच निघतील. ताळेबंदाचे डोक्यावर जें साल लिहिलें असतें त्या सालांत तो कागद तयार झाला असेल याचा संभव देखील होत नाहीं व अमुक साल्लीं तयार झाला असेल याची खात्री होण्यास ही साधन नसतें. उदाहरण (ताळेबंद परगणे नगर सन् १८५०) हा कागद कोणी ही बघितला असतां त्यास असें वाटेल कीं या कागदांत सन् १८५० साल्लांत परगणे नगर याताल्लुक्याची वहिवाट कोणते रीतीनें झाली असेल एवढी मा

त्र माहिती कळेल ज्याजती कांहीं कळावयाचें नाहीं अ-
शी पाहाणाराची समजूत कागदाचे डोक्यावरून होते.
परंतु सदर कागदांत सन् १८५५ सालीं झालेल्या गोष्टी
चा लेख जर आढळेल तर सदर कागद सन् १८५० सा-
लांत झाला नाहीं असें उघड दिसेल. याप्रमाणेंच पेश-
वे दप्तरांत तालेबंदाची वगैरे स्थिति आहे म्हणून समज
ण्यांत आहे.

दर एक सालीं दर एक माहालाचे पुष्कळ कागद त-
यार होत असत. त्यांत एकाच माहालांत एक उत्पन्न
एकाचे नावें खर्ची पडलेलें असतें व तेंच उत्पन्न त्या साल
चें त्याच माहालचे दुसरे हिशेबांत जमेकडे आढळतें. ए
काच सालांत एकाच माहालचे दोन अगर ज्यास्ती कागद
झालेले असतात त्यापैकीं एकांत एक उत्पन्न अ ज्याचे ना-
वें दाखल असतें व दुसऱ्यांत तेंच उत्पन्न नातवाचे नावें
दाखल असतें

सनदापत्रें वगैरे हुकूम जे होतात त्याची बार

निशी पेशव्याचे कीर्दीस असते ते बार कण्यास कांहीं नियम असतील असें वाटत नाहीं. कोणी एके मनुष्यास कांहीं एक उत्पन्ना बद्दल सरकारची सनद मिळाली असते त्यांत तें उत्पन्न भोगण्याची वंशपरंपरेने त्या इसमास सरकारांतून अधिकार दिला असतो व त्याच सनदेची बारनिशी पाहूं लागलें असतां त्यांत तें उत्पन्न अमुक इसमास इनाम दिलें आहे. इतके मोघम बारनिशीस आढळतें. वंश परंपरा हीं अक्षरें बारनिशींत मुळींच नसतात याच प्रमाणें कोणीही इसमाचे हातांतील सनदेंत वंशपरंपरा हा करार नसून मोघम इनाम जर लागलें असेल आणि त्याची बारनिशी पाहूं गेलें असतां तेंच उत्पन्न त्या इसमास वंशपरंपरेचे करारानें भोगण्यास दिलें आहे म्हणून दाखला सदर बारनिशीस मिळतो. अशा प्रकारचे फरक पुष्कळ या दप्तरांत आहेत पैकीं कांहीं उदाहरणार्थ सदरीं लिहिले आहेत. सारांष असल हुकूम वगैरे जे होतात व त्याची बारनिशी सांप्रतचे राज्यांत ठेवि-

ण्याची जितकी दक्षता आहे तितकी त्या काळीं स्वराज्यां त नव्हती. इनाम हा शब्द वंशपरंपरेचा आहे. असी समज त्या कालीं होती. सांप्रत ज्या इनामास वंश परंपरा असा करार असेल तें, व ज्यास नसेल तें, याचा भेद सरकार करीत आहे. तर मोघम इनाम, व वंशपरंपरेचें इनाम, असे शब्द सनदेंत व बारनिशींत लिहिण्याचें केवळ सनद लिहिणारा व बार करणारा यांचे मर्जीवर होतें.

जी सनद ज्या तारखेस झाली, त्या तारखेसच तिची बारनिशी नसते; सनदं झाले तारखेपासून महिना दोन महिन्यांचे अंतरानें त्या सनदेची बारनिशी असते; व कांहीं ठिकाणीं अगोदर बारनिशी एका तारखेस होऊन, त्यां तारखे पुढें आठ पंधरा दिवसांनीं इसमाचे नांवची सनद तयार होत असे.

कोणी मनुष्याचें उत्पन्न जप्त केल्या बद्दल सनद बार झालेली पेशव्यांचे किर्दीस असते, पण त्या सनदेवरून ती जप्ती अमलांत न येऊन, तें उत्पन्न त्या इस

माकडे फरक्षित चालत असते, व माहालचे वगैरे हि शेबांत तें उत्पन्न त्या इसमाचे नांवें दाखल झालेलें आ ढळतें, आणि ती जमी कधींच अमलांत न येऊन सन द फुकट पोकळीस राहाते.

सदरील पेशवे दप्तरांत जे चमत्कार आहेत त्या पैकीं कांहींसे मासले सदरीं लिहिले आहेत, त्यावरू न दप्तराची स्थिति कोणते प्रकारची आहे हें वाचणा- रे लोकांस सहज कळेल. असे प्रकारचें दप्तर जर सुप्रीम कोर्टांत कोणतेहीं कज्यांत पुराव्यास नेलें तर त्याची बळकटी व खरेपणा न्याय करणारे अधिका री कोणत्ते रीतीनें समजतील याचें अनुमान करत्तां ये त नाहीं.

पुण्यांत इंग्रजी अमल झाल्यावर हें पेशवे दप्तर लोकांचे घरांतून होतें, तें एकत्र करून नाना फडण- वीस यांचे वाडयांत सांठवून ठेविलें, व याशिवाय लो कांकडून ही पुष्कळ दप्तर जमा केलें, आणि त्याचा सं-

ग्रह करून ठेविला. सन् १८१८ पासून सन् १८२६ पर्यंत पु-
ण्यांत कमिशनरी अमल होता, तेव्हां हें दप्तर कमिशनर
चे ताब्यांत होतें. कमिशनरी मोडून कायदे सुरू झाल्या
वर कांहीं दिवस सरदार लोकांचे एजेंटाचे ताब्यांत हें द
प्तर राहिलें होतें. सन् १८३५ सालीं हें दप्तर प्रांतवार व
माहालवार लावून फेरिस्त तयार करण्यास्तव अमान
तदार यांचे स्वाधीन केलें. अमानतदार यांचीं नांवें वि-
तपशील.

१ बाळाजीपंतदादा. २ रामचंद्र पांडुरंग. ३ दप्तरदार निसबत
नातू सरपंच. दप्तरदारे. रिविन्यू कमिशनर
४ दप्तरदार नि॰ पुणें ५ प्रिन्सिपालसदरअमीन
कलेक्टर. जिल्हा पुणें.

या पांच असामीचे कमेटीस अमानतदार असें नांव
होतें; या अमानतदारांनीं दप्तरची व्यवस्था सन् १८३५
पासून सुमारें सन् १८४२ पर्यंत केली; त्यावेळेस दप्तर
ची किल्ली सरपंच यांजकडे राहात असे, व या कमेटी-

चे कामावर देखरेख मेहेरबान एजेंटसाहेब जिल्हा पुणे हे करीत होते. सन् १८४२ साली कर्नाटकांत इनाम व गैरची चौकशी मेहेरबान गोल्डस्मिड साहेब यांणीं आरंभिली, तेव्हां त्यांणीं पुण्याचे एजेंटास असें पत्र लिहिलें कीं, पेशवे दप्तर जर नेटीव लोकांचे स्वाधीन असेल तर तें बंदकरून ठेवावें, नेटीव लोकांचा आंत प्रवेश न होई अशी तजवीज ठेवावी; त्याजवरून एजेंटसाहेब याणें अमानतदार यांस चिडे देऊन रवाना केलें, आणि दप्तर मोहोरेनिशीं बंद ठेविलें. कांहीं दिवसांनीं मेहेरबान गोल्डस्मिड साहेब कर्नाटक महालचे कागद पेशवे दप्तरांतून निवडून कर्नाटकांत नेण्याकरितां पुण्यास आले, आणि त्यांणीं निवडकरून कागद नेले; तेथपासून दप्तरची योग्यता व महत्व फार वाटलें. दप्तर उघडणें झाल्यास कोणी साहेब लोकांनीं उघडावें, नेटिवांस हात लावणें झाल्यास साहेब लोकांचे समक्ष हात लावावा. या प्रमाणें कसोसीचा बंदोबस्त ठेविण्यास आ

रंभ झाला. नंतर मेहेरबान टरकीनसाहेब, व मेहेरबान गार्डन साहेब, व मेहेरबान कूपर साहेब, व मेहेर बानग्रिफित साहेब, यांचे स्वाधीन दप्तर नावाचे अनुक्रमानें होत आलें.

मोजेवार वगैरे हिशेब पेशवेदप्तरांत नाहींत, यामुळें मौज्यांतील किरकोळ जमीनीचे वगैरे फैसले करण्यास अडचण पडेल म्हणून लोकांकडून दप्तर जमविण्याचें काम सुरू झालें, व तें काम या खात्यांतील अधिकाऱ्यांनींच सुरू केलें. एका अधिकाऱ्यानें पेशवे दप्तर जाळण्याचा आरंभ केला, व दुसऱ्या अधिकाऱ्यानें दप्तर जमविण्यास आरंभ केला. हीं दोन्ही कामें एकासमयास जारी झालीं येणेंकरून सर्व लोक भयभीत झाले. लोकांस वाटूं लागलें कीं, हे अधिकारी आमचे कागद पत्र नेऊन जाळणार व हे कागद पत्र संग्रह करण्यास आमचे पूर्वजांस कायश्रम पडले असतील तें सांगवत नाहीं. मेहेर बानहार्ट साहेब याणीं लोकांनीं जु

मे कागद इनाम कमिशन खात्यांत असुक मुदतींत आ-
णून हजर करावे. म्हणून जाहिरनामा लाविला होता, त्या
जाहिरनाम्याप्रमाणें लोक कागद अग्नीचे भयानें हजर
करीनात. अश्या प्रसंगास लोकांचे मनांत भीति उत्पन्न
झाली, व त्यांणीं कागद न दिले यांत लोकांची चूक आहे
कीं काय?

लोकांनीं दप्तरचे कामांत हात आंखडलासा इना
म कमिशनचे अधिकाऱ्यांनीं पाहून, कांहींतरी न-
वीन युक्ति काढून हें जुनें दप्तर लोकांकडून आपले हस्त
गत होईल ती तजवीज काढणें त्यांसप्राप्त पडलें सदरील अ
धिकाऱ्यांनीं उपाय फार सक्तीचा योजला. तो असा कीं, लो
कांची घरें जप्त करावीं, घरांत मुसलमान व मराठे लोक
यांणीं शिरून घरचे मालकाचीं मुलें माणसें एकीकडे ब-
सवून धिंगाणा सुरू करावा. इनाम कमिशनचे अधिका
ऱ्यांनीं व कारकुनांनीं दिवसा मशाली वगैरे लावून सर्व घ
र शोधून कागदाचा पुर्जा न पुर्जा घरांतून वेंचून काढून

सरकार कचेरींत न्यावा. या जमीनीचे कामांत किती कुलपें तोडलीं, व इमारती वगैरे किती खणल्या याची गणना होत नाहीं. ही दसर भालेराई प्रथमतः पुण्यांत सुरू झाली, ते वेळेस पुण्यांतील रहिवाशी लोकांस होळकरीदंग्याचें स्मरण झालें. या दसर जमावाचे कामांत दौंडी, जाहिरनामा वगैरे कांहीं नसून इनाम कमिशनचे आकृटांत याबद्दल कांहीं शरत नमूद झाली ही नवती. पुणें शहरांत चार सरदार लोकांचीं घरें आहेत. त्यांवर जमीनीची धाड येऊं लागली. फडक्यांचे घरावर स्वारी गेली तेथें मालक घरीं नसून त्यांचा वकील घरीं होता त्याणें इनाम कमिशनचे अधिकाऱ्यांस सांगितलें कीं, मालकाचे हुकुमा शिवाय मी दसर देणार नाहीं; हा जबाब ऐकून अधिकारी लोक कुंठित झाले. गांवांतील धराधरी बंद झाली. नंतर कमिशनचे सर्व अधिकाऱ्यांनीं एकमत्त करून फडक्यांचे वकिलास सरकार कामास अटकाव केला हा दोष लावून, २०० रुपये दंड केला, तो दंड सरकारपर्यंत बहाल राहिला. हा दंड को-

णाते काखघावरून केला असेल तो असो. लोकांत दह-
शत बसून कागदजमिवण्याचें काम निर्वेध चालावें म्ह
णूनच हा दंड त्या वकिलास केलाअसावा.

तुळशी बागवाले राहाणार शहर पुणें यांणीं आप
ले घरांतील कागदपत्र कांहीं हरकत न करितां इनामक
मिशनचे अधिकारी यांस जितके होते तितके
नेऊं दिल्हे, म्हणून त्यांची शिफारस होऊन सरकारांनीं
सालीना त्रिवर्ग बंधूंस ३०० रुपये पेनशन ताह्यांत करू-
न दिलें; या शिवाय दुसऱ्याच्या बातम्या सांगणार लोक यां-
स बक्षिसें, व कोणास शिफारसी, व कोणास शाबासकी या
प्रमाणें या खात्यांतील अधिकारी यांणीं सरकारांतून देववि
लीं.

सदरील शिक्षा व बक्षिशीयेणेंकरूनदप्तर जमविण्या-
चे कामांत जो लोकांत गवगवा उत्पन्न झाला होता तो
नाहींसा होऊन, दप्तर जमविण्याचें काम सुरक्षित चा-
लूं लागलें.

लोकांकडून जप्ती करून जे कागद पत्र जमविले. त्यांत सरकार उपयोगीं किती याची निवड दप्तरचे मालकाचे पश्चात या खात्यांतील कचेरींत होऊन जे सरकार उपयोगीं नाहींत ते मालकास परत देत. व कांहीं ठिकाणीं असें झालें कीं लोकांकडील दप्तरें जीं जमाविलीं त्यांतील सरकार उपयोगीं जे कागद ते काढून घेऊन बाकी राहिले मालकास परत द्यावयाचे जे निघतील ते हजारों लोकांचे एकत्र करून एक ढीग घालून लोकांस नेण्याकरितां ठेविला होता त्या ढिगांत हजारों रुमाल असत त्यावर मालकांची नावें वगैरे कांहीं नसत कोणी मनुष्य आपलें दप्तर परत मागण्यास आला म्हणजे त्यास त्यां ढिगांत पाहून घे म्हणून सांगत असत. लोकांकडून दप्तरें आणून त्याची निवड करून लोकांचे हातांत जें दप्तर मालकाचे हातीं गेलें या धांदलींत पुष्कळ लोकांचे खासगी उपयोगाचे कागद पत्र गैर विल्हेस गेले त्याचा ठिकाण मालकास लागला नाहीं. जर कोणी

मनुष्यानें या खात्यांत येऊन अर्ज केला कीं, माझे दप्तरां त अमुक कागद सरकारानें दप्तर आणिलें त्या वेळेस होता, व हल्लीं जे मला परत दिले आहेत त्यांत तो कागद आढळत नाहीं तेव्हां या खात्यांतून त्या अर्ज करणारास असा प्रश्न होतसे कीं, तूं म्हणतोस हा कागद तुझे दप्तरांत होता कशावरून? यास प्रमाण काय? वगैरे कुंठित होण्याजोगे सवाल अर्जदारानें ऐकिले म्हणजे तो आपले कपाळास हात लावून मुकाट्यानें आपले घरीं अधिकाऱ्यांस राम राम करून चालता होई.

सदरीं लिहिल्याप्रमाणें पुणें, सातारा, व नगर या तीन जिल्ह्यांत दप्तर जमविण्याची धामधूम झाली तींत लोकांचा नफा किंवा नुकसान काय झालें असेल तें असो.

### इनामकमिशनचें कोर्ट व त्यांत कामचालतें त्याची पद्धत.

सन् १८५२ च्या अकरावे आकरावरून हें कोर्ट उत्प-

न्न झालें, त्यांतील अधिकारी यांणीं काय काम करावें, व त्यांस अकृत्यार किती आहे, व या कोर्टांत फैसल्ले कोणत्या प्रकारचे दुमाल्याचे होतील, व त्यावर अपील करणें झाल्यास पायऱ्या कोणत्या, वगैरेची व्याख्या सदर अकृटांत आहे. इनाम कमिशनर व त्यांचे असिस्टंट यांस, जिल्ह्यांतील मुख्य दिवाणी कोर्टाप्रमाणें अकृत्यार आहे, व जिल्ह्यांतील दिवाणी कडील मुख्य कोर्टास व या कोर्टास अपिलाचे बाबतींत मात्र भिन्नता राहील ती अशी कीं, असिस्टंटावर अपील इनाम कमिशनर याणें घ्यावें, व इनाम कमिशनरावर अपील मुंबई सरकारानें घ्यावें, या कोर्टांतील निवाड्यावर सदरील अधिकारी खेरीज करून दुसरें कोणतेही कोर्टांत अपिलें तपासलीं जाणार नाहींत, एवढी बाब खेरीज करून जिल्ह्यांतील मुख्य दिवाणी कोर्टांत व या कोर्टांत कांहींच फरक नसावा, असें सदरील आकृटावरून स्पष्ट आहे; पण तसें कांहींच नसून दिवाणी कडील कोर्टास व या कोर्टास जमीन अस्मा-

नाची तफावत आहे.

इनामकमिनर व त्यांचे अशिस्टण व सब अशिस्टण या प्रत्येकास फैसले व रपोट करण्याचा अकत्यार असून दिवाणी कडील अमलदाराप्रमाणें या अधिकाऱ्यास शपत वगैरे कांहींच नाहीं देणे घेणें व मारामारी वगैरे प्रकारचीं कामें तपासण्याचीं ज्या अमलदाराकडे आहेत त्यांस शपथ घेतल्याशिवाय सुटका नाहीं व त्या अधिकाऱ्याच्या हातून नजर चुकीनें अगर पक्षपातानें रयतेचें नुकसान झाल्यास तें नुकसान फार थोडा वेळ भोगण्यास लागेल. इनाम कमिशनचे अधिकाऱ्यांस दूध पाण्याचा निवाडा करून इनसाफ करणें आहे व त्या इनसाफानें नफा किंवा नुकसान जें होईल तें चिरकाल वंशपरंपरा रयतेस भोगणें जरूर आहे. तर एवढ्या नाजुक व महत्वाचे जे फैसले व रपोट वगैरे करितात त्या अमलदारांस शपथेची अवश्यकता आहे किंवा नाहीं याचा निकाल वाचणारांनीं करावा.

या कोर्टांत जो न्याय होणार, तो मेंढ्यां व वाघ यांचे इनसाफा प्रमाणें आहे. पाहा, वाघ व मेंढ्या यांची जर कांहीं पंचाईत पडली आणि तिचा इनसाफ करणें आहे, आणि तो इनसाफ करण्यास वाघ शपथ घेऊन न्याय करणार झाल्यानंतर त्या इनसाफाचें परिणाम वाघानें मेंढ्यांस खावें हें होणार. तसें शपथ देऊन या अमलदारास कामास बसविलें, तरी लोकांचीं उत्पन्नें घशांत उतरणें हा याचा वाघाप्रमाणें धर्म आहे. लोकांचीं उत्पन्नें विना कारण घेणें हें एक पातक आहेच, व शपथेचें दुसरें होणार, अशीं दुहेरी पातकें होतील हें जाणून या अधिकाऱ्यास शपथ नसेल असें समजलें पाहिजे.

सदरहू आकृतांत इनसाफ उघडे कोर्टांत करावा, किंवा खोली लावून करावा, व इनसाफ होते वेळेस उभयतां पक्षकार यांणीं हजर असावें, किंवा नसावें; एकमेकांचा पुरावा एकमेकांस कळून वादप्रतिवाद

व्हावा नेव्हावा. फैसलझाल्यावर फैसल्यांतील दाखल झालेले कागदांच्या नकला दुमालदारास मिळाव्या किंवा नाहीं. इनक्या विषयीं या आकटांत कांहीं एक उल्लेख नाहीं, पण वहिवाटींत कांहीं प्रकारांतर आहे

लोकांकडे परभारें उत्पन्न माफीनें किती चालतें, व लोकांस नक्त वगैरे सरकारांतून काय पावतें, याचे - तालुकेवार व जिल्हेवार तपशिलवार नक्के तयार होतात ते झाल्यावर, जें उत्पन्न जो मनुष्य खात असेल त्याला या खात्यांतून समान जातें, त्या समानांत तुम्हीं अमुक उत्पन्न खातां तें खाण्यास तुम्हांपाशीं सनदापत्रें वगैरे जो कांहीं पुरावा असेल तो घेऊन अमुक मुदतींत अमके कोर्टांत कैफियत देण्यास हजर व्हावें, म्हणून मजकूर असतो. हें समान त्या मनुष्यास पोचल्यावर मुदती प्रमाणें पुराव्यासहित कैफियत देण्यासतोकोर्टांत येतो. नंतर तें उत्पन्न त्या मनुष्यास अगर त्याचे पूर्व

ज्यांस कधीं कोणते सालीं मिळालें व किती दिवस हें उ-
त्पन्न तुम्हाकडे चालत आहे व हें तुम्हांस कोणीं दिलें व
मिळाले दिवसापासून हें उत्पन्न तुम्हांकडे चालण्यास
किती वेळा हरकती झाल्या व त्या दूर कोणते प्रकारें झा-
ल्या वगैरे त्या उत्पन्नाची हकीकत व मूळ संपादन करणा
रापासून कैफियत देणारापर्यंत वंशवृक्षसुद्धां त्या मनुष्या
कडून लिहून घेतात त्यास (कैफियत) म्हणतात.

उत्पन्न खाणारानें वर लिहिल्याप्रमाणें आपले उत्प
न्नाची हकीकत लिहून दिल्यावर त्या उत्पन्नदारास अ-
धिकाऱ्यांकडून हवेंतिकडे जाण्यास परवानगी मिळते.
नंतर त्याला या कोर्टांत कोणतेही रीतीनें येण्याचें कार
ण पडत नाहीं. कदाचित् तो होऊन आल्यास अधिका
री लोक शिपाई यांचे हातूनच त्याची निरवा निरव क-
रितात. ज्या उत्पन्नाबद्दल ज्या मनुष्यानें कैफियत लिहू-
न दिली, त्याच उत्पन्नाबद्दल इनाम कमिशनकडील अ-
धिकारी आपले नाव्यांतील धर्मशास्त्रासारखें जें दप्तर

त्यावरून एक हाकिकत उत्पन्न इसमास मिळाले दिवसापासून पेशवाई अखेर पर्यंत तयार करवितात. याप्रमाणें प्रकर्णाची तयारी झाली म्हणजे ज्या अधिकाऱ्याकडे तें प्रकर्ण फैसल्यास अगर रपोटास जातें तो अधिकारी उत्पन्नावर दावा करणार याणें जी हकिकत लिहून दिली असेल व त्याच उत्पन्नाबद्दल दप्तरावरून जी हकिकत (टिपण) तयार झाली असेल त्या एकमेकाशीं मोकाबला करून पाहतो. कदाचित कैफियतीसीं व टिपणाशीं विरुध्ध आल्यास त्याचा मेळ व अर्थ अधिकारी सरकार तर्फेनें काढितात. आणि फैसल्ला आपले कोठडींत आपण एकटेंच बसून करितात. ज्या उत्पन्नाबदल फैसल्ला होतो. तें उत्पन्न खाणाऱ्या मनुष्यांस इनसाफ होण्याच्या वेळाची संभूत वार्ताही ठाउक नसती. या तऱ्हेनें इनाम कमिशनचे अधिकारी लोक दावा करणारे लोकांचे पश्चात एक तर्फी ठराव करितात.

ठराव झाल्यावर ठरावाचा किंचित मासला ज्या-

उत्पन्नाबद्दल ठराव झाला, तें उत्पन्न ज्या गांवांत अगर ता लुक्यांत असेल तेथील पाटील अगर मामलेदार यांचे मारफत दावा करणारास इनामकमिशनचे अधिकारी पोंचता करितात. जो मासला दावा करणारास पोंचतो त्यांत मजकूर खालीं लिहिल्याप्रमाणें असतो.

"तुम्हीं अमुक उत्पन्न तुम्हांकडे चालण्याबद्दल"
"दावा केला,, त्याजबद्दल कैफियत लिहून दिली, त्या"
"उत्पन्नाची पेशवे दप्तरावरून हकीकत पाहतां इ"
"नामकमिशनचे अधिकारी असा ठराव करितात"
"कीं, सदरहू उत्पन्न तुम्हांकडे नाहाय्यात म्हणजे"
"तुम्हीं जिवंत आहां, तोंपर्यंत चालेल, तुमचे पश्चा"
"त् तें उत्पन्न सरकारखालसांतींत येईल."

असा उतारा दावा करणारास मिळाला, म्हणजे त्याला मुख्य इनामकमिशनरास अगर सरकारास कायद्याअन्वयें अपील करण्याशिवाय दुसरा उपाय सूचत नाहीं, व त्याणें लिहून दिलेली

हकीकत (कैफियत) याची नकल इनाम कमिशनचे अधिकारी घेऊं देत नाहींत. या मुळें त्याला आपण काय लिहून दिलें त्याचें स्मरण नसतें, या खेरीज अधिकाऱ्यांनीं तें उत्पन्न बुडविण्यास दप्तरावरून जें अस्त्र (टिपण) कादलें असतें, त्याचीही नकल त्यास मिळत नाहीं. सारांश, या दावा करणारे लोकांचे पश्चात् त्यांचे उत्पन्नाचे फैसले या कोर्टांत होतात, व फैसल्यांतील कागदांच्या नकला त्यास मिळत नाहींत.

वर लिहिले फैसल्या खेरीज अपील करण्यास दुसरें साधनसूत्र दावा करणारा पाशीं कांहींच नसतें, या मुळें तो अगदीं चकित होऊन जातो.

अधिकारी लोकांस जे पगार देतात त्यांचा नफा करणें त्यांस अवश्य असतें; व ते तसें न करितील तर त्यांच्या चाकऱ्या राहणें कठीण आहेत. जो अमलदार कुतर्क कादून सरकार हित करील तो हुशार, व त्यास च पगार वाढेल, असें बाळकडूं या वरील अमलदा-

रांस पाजलेलें आहे. असे अधिकाऱ्यांनीं केलेले फैसल्यां वर अपील कांहीं एक पुराव्याखेरीज केलें, तर कोणते प्रकारें दाद लागत असेल, हें सहज दिसत आहे. तोंड धरून बुक्यांचा मार अशी दशा सांप्रत दुमालदार लोकांस प्राप्त झाली आहे.

या आकृदांत उत्पन्नाचें भोग्य कोणते रीतीनें मोजलें जाईल, व त्याची मजबुदी उत्पन्न खाणार यास कशी कशी प्राप्त होईल, हें स्पष्ट आहेच. त्याज विशीं आणखी उपपादन करणें योग्य नाहीं, सबब करीत नाहीं. दुसरें या आकृदांत इनाम वगैरे दुमाला देण्यास कोणास अधिकार होता, व कोणास नव्हता, याचा निकाल करणें सरकाराकडे आहे, म्हणून एक मोघम कलम आहे. अमुक लोकांस अधिकार होता, व अमुक लोकांस नव्हता, याचा नावनिशीवार तपशील नाहीं. अशा अमुक्त कलमाची योजना प्रसंगोपात हवी तशी करितां यावी, म्हणून हें

कलम मोघम ठेविलें असें स्पष्ट दिसत आहे. अपहार बुद्धी पासून या कलमाची उत्पत्ति झाली आहे, असें म्हटलें पाहिजे. कदाचित् कोणी असें म्हणेल कीं, या सरकारानें जे कायदे वगैरे या देशांत चालू केले, ते माजी राज्यांतील वहिवाटीस अनुसरून केले, तर माजीराज्यांत कोणी द्यावें व कोणी न द्यावें, याचा प्रतिबंध कांहींच नव्हता. गावचे मुकदमा पासून प्रांताचे देशमुख देशपांडे पर्यंत, व शेकदारापासून राज्यांतील मुख्य प्रधाना पर्यंत कोणी कोणासही कांहीं उत्पन्न दिल्यास देणारास अधिकार नाहीं, म्हणून पेशव्यांनीं राज्य करणा खेरीज दिलेलें उत्पन्न नामंजुर केलें असें एकही उदाहरणसांपडणार नाहीं. माजिराज्यांत कोणी कांहीं दिलें तरी सरकार कबूलच करीत असेंत.

ज्या लोकांचा या आकूटाशीं अति निकट संबंध नसेल त्यांणीं या आकूटांतील शब्द पंक्ती

वाचल्या, तर दावा करणार याचे समक्ष
फैसला होत नसेल, व अधिकारी लोक, झांकले को-
डतांत दावा करणार गैरहजर असतां, फैसल करी-
त असतील, व दावा करणारास अपील वगैरे क-
रण्या करितां फैसल्याचे कागदांच्या नकला मिळतन
सतील, या विशींचा कांहीं एक अंदेशा वाटेल कीं का-
य? नाहीं, या आकृतानें जे फैसले होणार त्याशीं व दे
ण्या घेण्याचे फैसल्याचे रीतीशीं अपिलाची बाब खे-
रीजकरून कांहीं एक भिन्नता नाहीं, असें असतां
या कोर्टात दावा करणार हजर नसतां एक तर्फीच
ठराव होतात, अशी प्रकारांतर वहिवाट चालू अस
ले कारणानें लोक आपले ठिकाणीं दुःखांत किती
चूर आहेत, हें लिहितां येत नाहीं. अश्या प्रकारचा न्या
य य कोर्ट पृथ्वीवरील कोणत्याही सुधारलेल्या
देशांत असेल असें वाटत नाहीं. आमचे कंपनी सर
कारचे हिंदुस्थानांतील इलाक्यांत असें कोर्ट कोठेंच

नसेल व नाहीं.

आकृटावरून या कोर्टाविशीं मुंबई, कलकता, व विलायत या तिन्ही सरकारांस समज, जिल्ह्यांतील मुख्य दिवाणी कोर्टा प्रमाणें असेल, याविशीं संशय नाहीं, परंतु वहिवाट त्यांचे समजुती विरुद्ध चालून लोकांत विवंचना व दिलगिरी उत्पन्न झाली यांत रयतेचें दुर्दैव समजलें पाहिजे.

## दत्तकप्रकरण.

या हिंदुस्थान देशाची व भुगोलावरील इतर देशांची राजकीय स्थितीची तुलना करून पाहिली असतां हा देश इतर देशांपेक्षां अतिशय हतभाग्य दिसतो. प्राचीन कालापासून हा देश परस्थ लोकांचे ताब्यांत राहात गेला, व हल्लीं ही आहे. पहिली पिरी मिजासी मोगलांची. त्यांची भाषा, चाली, धर्म वगैरे सर्व कांहीं एतद्देशीय लोकांचे चालीवगैरेशीं अगदीं विरुद्ध होतीं. राजनीतिकडे पाहावें तर बेबंद-

राज्य

झोटिंग बादशाही, राजाचा विचार लोकांस कळेना, व लोकांचे विचार राजास कळेना. मोंगलांनी अमुक रीतीनें अगर पद्धतीनें या देशांत राज्य केलें. याचा साधारण नेम कांहीं आढळत नाहीं. सर्व बादषाहांनीं आपआपले अकलेनें राज्य केलें त्याचा एकाचा मेळ एकास नाहीं. एकानें हिंदू लोकांस व त्यांचे धर्मास उदारपणें आश्रय दिला, व दुसऱ्यानें फार सक्तीनें उछेद केला, असा क्रम दिसतो. दुसरी पिढी इंग्रज सरकार यांची आहे, हे मोंगलापेक्षांही दूर देशचे राहाणारे असून यांचा धर्म, भाषा, व रीतिवगैरे हिंदूलोकांपासून अतिशय भिन्न आहेत. हे लोक मोंगलां सारखे मिजासी नव्हेत, विद्वान्, शूर, मेहनती, कुशल, साहसकर्मी, विचारवंत, व सूज्ञ आहेत, यांची राजनीति, मोंगलापेक्षां चांगली आहे, व हे लोक आपले राजकीय विचार लोकांस कळविण्यास व लोकांचीं मनें, व मतें, व समजुती आपल्यास समजाव्या म्हणून फार उछुक आहेत.

या देशांत परंपरागत चालत आलेले राजनीतीशीं व सांप्रतचे राजनीतींतील कांहीं दोष खेरीज करून बाकीच्यांशी मुकाबला केला असतां, सांप्रतची राजनीति खचित चांगली दिसती. सांप्रतचे राजनीतींत प्रजाधर्म व राजधर्म असे दोन प्रकार आहेत. प्रजेचे हक्क व राजाचे हक्क यांचा एकमेकांस कोणते रीतीनें सांखळ आहे, व या दोन्हींची एकवाक्यता केल्यानें किती सुख व लाभ उभयपक्षीं होईल, हें सांगवत नाहीं. राज्यकर्ते यांचें अकलेनें, संपत्तीनें, व सत्तेनें इत्यादि गुणेंकरून पार्डे रयतेच्या पाड्यापेक्षां लसपट वर आहे. यामुळें रयत राजाच्या उद्देशाप्रमाणें सुखानुभव घेण्यास लायक नाहीं, यांत रयतेचें कमनशीब आहे. यास उपाय नाहीं. अश्या शाहाण्या राजाशीं व वेड्या प्रजेशीं ईश्वरें गांठ घातली आहे, तरी आतां उभयपक्षीं, "पदरीं पडलें पवित्र झालें" म्हणून वागविणें व वागणें उभयतांस उचित होय.

साम्प्रत हिंदू लोक वडे व दरिद्री असून केवळ मेंढीसारखे गरीब आहेत, याचा अनुभव सरकार आज आडीच वर्षे घेतच आहे. सरकार जो कायदा काढितें, त्याला निमुटपणें आपली मान ओंक देतात, ही संधी पाहून सरकारानें लोकांच्या अनादिसिद्ध चालीस व धर्मास मोंगलाई प्रमाणें उघड रीतीनें द्वेष नकरितां कपटरूपानें क्षीणत्व आणण्यास प्रवृत्त व्हावें कीं काय?

आजपर्यंत सरकारानें कायदेकानू वगैरे जे केले ते सर्व या देशाची मामुल वहिवाट, लोकांचे धर्म, व मनें यांजवर नजर देऊन केले, यांत सरकारचें नुकसान झालें असेल यांत संशय नाहीं. दासीविक्रय, सती, बालहत्या, इत्यादि चालींविषयीं सरकारानें रयतेस प्रतिबंध केला, या पासून लोकांस फारसें वाईट वाटलें नाहीं. सरकारानें इतके दिवस हिंदूराजनीती प्रमाणें वागलें,

हें बाह्यात्कारी दाखवून, लोकांचीं मनें आकळून घेतलीं. जसें मातापितरें लहान मुलाचा लडिवाळपणा चालवितात, त्याप्रमाणें सरकारानें या लोकांचे लाड चालविले. एकाएकीं लोकांस दुःख किंवा सुख होईल याचा विचार सरकारानें न पाहतां द्रव्यलोभानें अगर दुसरे कोणते कारणानें अशा निंद्य कर्मास सरकारचा हात रयतेवर धजावूं लागला हें कळत नाहीं.

पाहा, या लोकांत वंश नष्ट होऊं लागला असतां दत्तक घेण्याची चाल अनादिसिद्ध असून इनामदार व जाहागीरदार वगैरे लोकांनीं सरकारपरवानगीशिवाय दत्तक घेऊं नये, व कोणी परवानगीशिवाय घेतल्यास तें उत्पन्न त्या दत्तकाकडे चालणार नाहीं, म्हणून सरकारानें हुकूम फर्माविला आहे; व वहिवाटही सन्न १८३६ सालापासून सुरू आहेच. आलिकडे या खात्यांतून बहुत

उदाहरणें, व त्या उदाहरणांची योजना दत्तकमना-ईवर झाली, येणेंकरून मुंबई, कलकत्ता, व विलायत या तिन्ही सरकारांची दत्तकप्रकरणाविषयीं खात्री होऊन गेली.

जर कोणा मनुष्यास पुत्रसंतान नाहीं, आणि तो मेला असतां त्याच्या वंशाचें नक्कल होतें. असें ज्याचें नक्कल होईल, तो अधम व माहापातकी, असें लोक समजतात. त्याला असा शास्त्रआधार ही आहे. अशी अधम गति आपणास प्राप्त नव्हावी म्हणून प्रत्येक मनुष्य आपआपली हुशारी ठेवीत असतो. हिंदुशास्त्राप्रमाणें मुलगीचा दाया बापावर मुलाप्रमाणें पोंचत नाहीं, व पितृकर्में करण्यास तिला अधिकार ही परकुलांत गे-ल्यासबबेनें राहात नाहीं, म्हणून या लोकांत दत्तक घेणें अवश्य होतें. ज्या मनुष्यास पुत्रसंतान नाहीं, तो आपले भाऊबंदांपैकीं, अगर

भाऊबंद नसल्यास स्वगोत्रिक कोणते तरी म-
नुष्याचा मुलगा घेतो, त्याचें विधिपूर्वक दत्तवि-
धान करून घेणारा तो मुलगा आपला असें
म्हणवितो. दत्तविधानानें त्या मुलाच्या जन्म घे
तल्या कुळाशीं सर्व संबंध सुटून नाहींसा हो-
तो, आणि ज्यानें दत्तक घेतला त्याजकडेस
सर्व संबंध प्राप्त होतोत

सांप्रत ज्यास उत्पन्न सरकारांतून आहे त्या-
नें सरकारपरवानगीशिवाय त्या उत्पन्नास द-
त्तक घेऊंनये, म्हणून सरकारानें ठराव केला
आहे, तर हा ठराव या सरकारानें माजीराज्यां-
तील शिरशिल्यावरून केला असावा, हें खरें
असेल तर माजी राज्यांत दत्तक घेण्याबद्दल
कशी काय वहिवाट होती, व तीच वहिवाट या-
सरकारानें मुस्तकीम धरून आम्हांस दत्तक
घेण्याची मनाई केली आहे, अगर या सरकारचे

हाताखालील लोकांनीं दत्तकप्रकरण गैरवाका समजाविलें. यावरून अशी मनाई झाली आहे, या दोन गोष्टींचा विचार चालते प्रकरणांत मुख्यतें करून पाहिला पाहिजे.

माजीराज्यांत ज्या लोकांची हरएकरीतीनें व पेशानें राजाशीं फार सलग्नता होती, त्या लोकांस प्रसंगानुसार दत्तक घेणें झाल्यास सरकारची मंजुरी लागत असे, व किती एक लोक सरकार मंजुरीशिवायही दत्तक घेत असत. या प्रमाणें मुत्सदी, व शिलेदार, व सरदार या लोकांत वहिवाट होती. बाकी ज्या लोकांचा रयत या नात्याखेरीज सरकाराशीं दुसरे रीतीनें संबंध नसे, त्या लोकांस दत्तक घेणें झाल्यास सरकार मंजुरीची अवश्यकता नसे. जर कोणी सरदार, शिलेदार, व मुत्सद्दी ज्याकडे सरंजामवगैरे पुष्कळ उत्पन्न असे, आणि तो दत्तक घेण्यास इच्छील,

तर त्यास सरकारांत कांहीं पैका द्यावा लागत असे. त्यास (नजर) म्हणतात. ही नजर सरंजामदार अगर जो कोणी दत्तक घेण्यास इच्छीत असेल, त्याचे मगदुरीनुरूप सरकारांत घेत असत. व कितीएक लोक सरकारांत कांहींएक दिल्याशिवायवसरकारची परवानगी घेतल्या शिवाय दत्तक घेत असत, नंतर जो परवानगीशिवाय, व नजरेशिवाय दत्तक झाला त्या दत्तकाकडे त्याचे खानदानींत जो सरंजाम वगैरे चालत असे तो त्या दत्तकाकडे सरकारांतूनच चालवीत, व सरदारी वगैरे सर्व त्या घराण्यांत जी चालत असेल ती त्या मुलाकडे सांगत. अशी वहिवाट होती.

माजी राज्यांत लोक सरंजामाखेरीज दुसरा हुद्दा मागण्यास व घेण्यास फार लाजिर्वाणे होत असत. तशांतून सरकारानें खुष होऊन

कांहीं देणगी दिल्यास उपाय नाहीं. इनाम, वर्षासन वगैरे ज्याकरितां चाकरी सरकारांत मुळींच करावी लागत नाहीं. अशा प्रकारच्या देणग्या भट्ट भिक्षुक दरिद्री लोक, व देवस्थानें, यांखेरीज इतरांनीं सरकारांत फारशा मागितल्या नाहींत, व सरकारांनींही दिल्या नाहींत. कोणीं एकादें स्तुत्य काम केलें, अगर स्तुत्य कामावर उपयोगीं पडला, तर सरकानें त्याचे मागण्याची वाट न-पाहातां आपणाच होऊन इनाम वगैरे देत असे.

या प्रमाणें दत्तकाची वहिवाट माजी राज्यांत होती. पुढें इंग्रेजी अमल झाल्यावर इस्तकबील सन्न १८१८ इसवी तागाईत सन्न १८२६ पर्यंत कमिशनरा अमल या प्रांतांत होता. ते समयीं इनाम वगैरे प्रकारचे देणगीस दत्तक घेणें झाल्यास सरकारचा हुकूम लागत नसे, परंतु कांहीं लोकांनीं सरकारास विचारलें, व कांहींनीं

नविचारलें, अशा दोन प्रकारच्या वहिवाटी झा-
ल्या असें समजण्यांत आलें आहे. जर कोणा
सरंजामदारास दत्तक घेणें झाल्यास सरकारप-
रवानगीशिवाय कोणी दत्तक घेतला नाहीं.

मेहेरबान अल्पिस्टन कुलअखत्यार क-
मिशनर साहेब हे प्रथम या देशांत होते साहेब
बाहादूर यांसारिखा शाहाणा व दूर दृष्टि पोंच-
णारा असा मुत्सदी या प्रांतांत कोणी झाला-
नाहीं, व पुढेंही होणें नाहीं.

साहेबबाहादूर यांचे कारकिर्दीस जे नमुनें
अगर वहिवाटी हरएक कामांत बसल्या गेल्या,
त्यांजविषयीं वाजवी गैरवाजवी हें पाहाण्याचा
कोणाचा मगदूर नव्हता, व हल्लींही नाहीं. या द-
त्तक प्रकरणांत त्याचे लेखास व अकलेस इना-
मकमिशनचे तर्कटानें थोडासा आयब प्राप्त
झाला असें म्हटलें पाहिजे.

ज्याकडे सरंजाम व जाहागिरी असेल, आणि त्या स दत्तक घेणें झाल्यास सरकार परवानगी शिवाय त्यांणीं दत्तक घेऊं नये, असा साहेब बाहादूर यांचे मनांत जो ग्रह झाला तो माजी वहिवाटीवरून झाला असावा. माजी राज्यांत सरकारांत कळविल्या खेरीज सरंजामास व जाहागिरीस दत्तक नजर दिल्या शिवाय होत असत अशी ही वहिवाट होती, म्हणून पेशजी लिहिलें आहे, असें असतां साहेब बाहादूर यांणीं सरकार हुकुमाशिवाय दत्तक होऊं नये अशी जी वहिवाट स्रुरू केली, ती केवळ एकपक्षी नजरेनें केली असावी. असो साहेब बाहादूर नवीन या देशांत आले असून एवढा विस्तीर्ण कारभार चालवीत होते, त्यांतही नज़र त्यांची केवळ धांदलीनें चकली असेल असें म्हणणें योग्य आहे.

जर प्रस्तुतच्या अधिकाऱ्यासारखी त्यांस फुरसत असून त्यांणीं या दत्तक प्रकर्णांत इनामकमिश-

प्रमाणें कीस काढला असता तर सरंजामास देखील सरकार हुकुमाची जरुरी नको; असा ठराव साहेब-बाहादूर यांणीं केला असता. साहेबबाहादूर यांचे लेख आजपर्यंत सरकारानें या देशाविषयीं केवळ वायबलाप्रमाणें मानले, त्या लेखाविरुद्ध कधींही व-हिवाट सरकारानें केली नाहीं, असें असतां या दत्त-क प्रकर्णमंथनांत त्यांचे लेखाचे गुप्त अर्थ आहेत म्हणून अनेक अर्थ अक्कलवान लोकांनीं काढिले हें मोठें आश्चर्य आहे.

२ "माजी अमलांत इनामदारवगैरे लोक आप-" "आपलीं उत्पन्नें ज्यास पाहिजे त्यास देत, विकीत अग" "र त्या उत्पन्नाचा व्यय ते हवा तसा करीत असत." म्ह-णून कांहीं एक प्रकर्णांत कपतान राबर्टसन् साहेब पुण्या चे कलेकटर यांणीं मेहेरबान चापलीनसाहेब यांस लिहून कळविलें. त्यांणीं तें प्रकर्ण मुंबई सरकारांत र-वाना केलें. मुंबईचे कोन्सलांत मेहेरबान अलपिष्टण

साहेब गव्हरनर होते, व साहेब बाहादूर यांणीं पूर्वी कमिशनरी हांकलीच होती. यामुळें त्यांस एतद्देशीय लोकांचे धर्म, रुढी, रीती वगैरे, सर्व प्रकारांत वाकब होतेच. साहेब बाहादूर गव्हरनर असतां कौसलांतून एक वर दत्तक संबंधीं तारीख ३ माहे जून नंबर ६९० चा झाला त्यांतील मजकूर खालीं लिहिल्या प्रमाणें आहे.

"जे दत्तक चालू परवानगीनें व विधीनें"
"होतील त्यांचा दावा ज्या प्रमाणें खास"
"गी जिनगी वर चालतो त्या अन्वयें इना"
"मावर चालेल हा दक्षणेंत साधारण नि"
"यम समजावा."

३ मेहेरषान मालकम साहेब मुंबईचे गवरनर असतां त्यांणीं असा हुकूम फर्माविला आहे कीं, "कोणास आपलें इनाम दुसऱ्यास देणें झाल्यास, अगर कोणा इनामदारास दत्तक घेणें आल्यास त्याजक-

कून सरकारांत नजर घेतजावी. हा हुकूम गव्हरनर साहेब यांचे वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं नापसंत केला, म्हणून नजरेची वहिवाट सुरू झाली नाहीं.

४ लार्ड कूयर साहेब मुंबईचे गव्हरनर सन् १८३१ मान्लीं होते, त्यांचे कारकीर्दींत दत्तक प्रकर्ण पुनरपी चालू झालें त्यांत साहेब बाहादूर यांणीं आपलें मत्त लिहून एक वट केला तो.

"मजपुढें आली कडेस पुष्कळ प्रकर्णे आलीं"
"त्यांवरून असें दिसतें कीं कलेकटरांस सर"
"कार कोणते प्रकारचे दत्तक कबूल करते ये"
"विशीं बराबर समज नसून उलटी गैरस"
"मजूत व भ्रांति पडली आहे. तर ही भ्रांति"
"नजरेचे हुकुमानें झाली असेल ती दूर हो"
"ण्याकरितां सरकारचा हुकूम ता० ३ जून"
"सन् १८२५ इसवी रोजीं झाला तो पुनरपी"
"कलेकटरांस व लोकांस माहित होण्या"

"करितां प्रसिद्ध करावा, असा ठराव केला, आणि"
"बट झाला तो.

## सरक्यूलरनंबर १५४९

"कोणचीं दत्तविधानें मंजूर होतील व कोणतीं"
"नामंजूर होतील, येविशीं बहुत संशय उत्पन्न"
"झाला आहे, असें सरकारचे समजण्यांत आ"
"लें म्हणून गव्हरनर कौंसलचे आज्ञेवरून खा"
"लीं लिहिलेला हुकूम तुमचे माहिती करितां व"
"वहिवाटीकारितां फरमाविला आहे".

१ "दक्षण प्रांतांत जे दत्तक चालू परवानगींनें"
"व निधीनें होतील, त्याचा दावा खाजगी मिळ"
"कतीवर जसा पोहोचतो त्या अन्वयें इनामा"
"वर समजावा."

२ "फक्त जाहागिरीस मात्र कोणतेही प्रका"
"रचा दत्तक झाला तरी दावा पोहोचणार ना"
"हीं. तो दत्तक सरकारानें मंजूर केला असेल"

"तरच कायम समजला जाईल."

मुक्काम मुंबई ता० २४ अकटोबर सन् १८३१ ई० } सही. न्यूहम सक्रेतार.

इंग्रजी अमल झाल्यापासून सन् १८३६ पर्यंत अशी तशी वहिवाट चालत आली. छत्तीसा पुढें ज्या लोकांस सरकारांतून हरएक प्रकारचा दुमाला अ सेल आणि त्यांस दत्तक घेणें झाल्यास सरकारप रवानगी दत्तक घेण्या पूर्वी अवश्य घ्यावी. जर कोणीं न घेईल तर तें उत्पन्न त्या विन् मंजुरीचे दत्तकाकडे चालविलें जाणार नाहीं, अशी वहिवाट सदर सालापासून चालू झाली.

५ मेहेरबान हर्ट साहेब यांणीं करनाटकांत असतां दत्तक प्रकर्णाचे मंथनास आरंभ केला. सन् १८४५ साली सरकारांतून असा एके प्रकरणांत संशय उत्पन्न झाला कीं, — "इनामदारानें जें उत्प- "न्न आपले पुत्रपौत्रादिकां करितां संपादन केलें आ"

"णि तो वंश नष्ट झाला असतां, तें उत्पन्न सरकार"
"खालसांत येण्याचें असून इनामदानें दत्तक घेत"
"ल्यानें व तें इनाम त्या दत्तकाकडे दिल्यानें सरका"
"र खालसातीचा हक्क त्या उत्पन्नावरील नाहिंसा"
"होती कीं काय?" या दत्तकाबद्दल माजी राज्यांत को
णते प्रकारची वहिवाट होती ही पाहून सरकारां
त निवेदन करण्यास हन्टसाहेब यांस सरकार-
ची अज्ञा झाली होती.

६ पुणे जिल्ह्यांत एका इनामदारानें सरकारावर दिवाणीकडे दावा केला होता. त्या मोकदम्यांत सातारा, बडोदें, व ग्वाल्हेर एथील रसिदंदाकडे तिकडील संस्थानिकांचे मुलुकांत दत्तकाबद्दल प्रश्न केले ते.— कोणांस इनाम विकणें झाल्यास, अगर त्या इनामाचा दुसरे कोणते रीतीनें व्यय करणें झाल्यास, व दत्तक घेणें झाल्यास, सरकार परवानगी अवश्य आहे कीं काय? व अश्या प्रकारचे

अर्ज करणारा कडून कांहीं नजर घेतात कीं काय?

७ सदरील तिन्हीं ही संस्थानांतून रसिदंटांक- डून जे जबाब आले, ते सरकारानें मेहेरबान ह- न्ट साहेब यांजकडे दत्तका बद्दल एकंदर रपो- टांत सामील होण्या करितां रवाना केले.

८ "रसिदेंट यांचे लिहिण्यावरून असें समज तें कीं सदरील संस्थानचे इलाख्यांत जर कोणास इनाम विकणें अगर बक्षीस दुसऱ्यास देणें झाल्या स व त्या इनामास दत्तक घेणे झाल्यास सरकार हुकुमाची अवश्यकता आहे असा सर्व साधारण नेम असेल असें दिसतें, पण जर उत्पन्नाची किं- मत फारच क्षुल्लक असेल तर हा नेम जारी रा- हात नाहीं. पेशवाईत असे हुकूम घेण्याची वहि वाट एकसाहा होती, व क्वचित् ठिकाणीं कामगार लोकांचे लबाडीनें अगर गफलतीनें वहिवाटीस भंग ही झाला आहे. सन १८११ च्या सरक्यूलरचा

अर्थ जर सर्व हिंदुस्थानांत दत्तक घेण्यापूर्वी सरकार परवानगी घेण्याची चाल आहे, तरी त्या सरक्युलरांत विधीनें व हुकुमानें दत्तक झाले असतील ते इनामास मुकरर होतील, तरी सरकारचा हुकूम घेणें हा एक दत्तविधानाचा विधीच समजला पाहिजे." याप्रमाणें मेहेरबान हन्ट साहेब यांणीं ३१ चे सरक्यूलराचा अर्थ ओढून काढून दत्तकप्रकर्ण सरकारांत निवेदन केलें.

९ "ता० ३ माहे जून सन् १८२५ इसवी रोजीं जो दत्तकाबद्दल हुकूम सरकारचा झाला आहे, त्या अन्वयें आम्हीं (इंग्रजांनीं) अव्वलीपासून या देशाची व्यवस्था केली आहे, त्याचा सांप्रत आपण भलताच उलटा ओढून अर्थ करणें एणेंकरून रयतेशीं सरकारचे बेमान होईल !" असें मेहेरबानवार्डिनसाहेबांचें मत आहे

१० कपतान राबर्टसन् पुण्याचा कलेक्टर व मेहेरबान चापलीन साहेब दक्षणेंतील दुसरे कमिशनर

असतां, यांणीं दत्तका बद्दल जें कांहीं लिहिलें तें सर्व धांदलीनें झालें असावें, असें हार्ट साहेब म्हणतात.

११ दत्तका बद्दल सदर्हू हान्ट व वार्डीन वगैरे साहेब लोक यांच्या मतें २५।३१ या सालांत झालेली सरक्यूलरें या सर्वांचा गोषवारा काढून मेहेरबान गोल्ड स्मिथ साहेब यांणीं मुंबई कौंसला पुढें ठेविला. त्या गोषवाऱ्या वरून सरकारचा निकाल असा झाला कीं, "दत्तक देणें अगर नाहीं म्हणणें ये विशींचा अधिकार सरकारचा आहे असें सदरील गोषवाऱ्या वरून उघड दिसत आहे;" हा निकाल सरकारांनीं मेहेरबान हान्ट साहेब यांस कळवून असें लिहिलें कीं, मुंबई सरकारचा दत्तका बद्दल हल्लीं जो अभिप्राय ठरला आहे, हा कलकत्ता व विलायत सरकारास कळवून त्यांचा अभिप्राय आल्यावर काय तो अखेर निकाल करण्यांत येईल.

कोर्ट आफ डायरेक्टर यांचा ता॰ २२ मे सन १८५०

इसवीचा हुकूम.

"जीं प्रकर्णे आजपरयंत आम्हांकडे येतगे"
"लीं, त्यावरून मुंबई इलाक्यांत जाहागीर"
"व सरंजाम या दुमाल्यास जे दत्तक होतील,"
"त्यांसच फक्त सरकारचे आज्ञेची जरुरी आ"
"हे. इनाम संस्थान या दुमाल्यास जे दत्तक हो"
"तील, त्या दत्तकांस सरकारचे हुकुमाची ज-"
"रुरी नाहीं, व त्यांत सरकार हात घालीत ना-"
"हीं; अशी वहिवाट होती, असें आम्हीं समज"
"त आहों. परंतु हान्टसाहेब यांच्या रपोट,व"
"सांप्रतचे संस्थानिक यांचे इलाक्यांतील व-"
"हिवाटयांवरून मुंबई सरकारानें सरंजामाप्र-"
"माणें इनाम व संस्थान यांस दत्तक घेणें"
"झाल्यास सरकार हुकुमाचें आगत्य आहे"
"म्हणून ठराव केला, तो आम्हांस पसंत आहे"

ता० २३ माहे मार्च सन् १८५३ इसवी. कोर्ट

आपले रपोर्टांत सामील केला आहे. त्यांतील सारांश

"या देशीं स्वराज्यांत सर्व तऱ्हेचे दुमाले राजा-"
"च्या मर्जीस येईल, तेव्हा ते खालसा करीत"
"असत. चाकरीबद्दलच्या देणग्या इसमा"
"कडे चाकरी आहे तोंपर्यंत चालवीत, व ध"
"र्माकरितां निरंतर चंद्र, सूर्य आहेत तोंप-"
"र्यंत चालण्यासारखे जे दुमाले दिले अस"
"त, ते दुमाले अवकाशानें घेत असत. इ"
"नाम व जाहागीर ह्या देणग्या, कोणी राज्य-"
"कारणास उपयोगीं पडला, अगर कोणीं"
"मेहेरबानींतील मनुष्य असेल, त्यास देत;"
"पण अश्या प्रकारच्या देणी फार क्वचित"
"निरंतर चालत. सारांष त्या कालीं या दु"
"माल्यांविषयीं कांहींच नियम नव्हता. रा"
"जाची मर्जी हा कायदा असे."

सदरील मजकूर मेहेरबान सर टामसमनरो

रो साहेब यांचे मिनिटांत आहे. मेहेरबान कपतान कोपर साहेब यांणीं एक शिप्याचें उदाहरण आपले रपोटांत सामील केलें आहे. त्या शिप्यास सरकारांतून दुमाला कांहीं एक नसून, त्यांस दत्तक घेणें झालें, तेव्हां, त्याणें पेशव्यांस अर्ज केला, आणि पेशव्यांनीं हुकूम दिल्यावर त्याणें दत्तक घेतला. व दत्तक घेण्यापूर्वीं नजरही दिली.

१३ सदरील बारावे कलमांत लिहिलेला मजकूर कूपर साहेब यांणीं अनेक रीतीनें वर्तक्रानें दत्तक प्रकर्णाचे रपोटांत लिहून मुंबई सरकाराकडे ता० २६ माहे मे सन् १८५५ इसवी रोजीं पाठविला नंतर सरकारांनीं कोर्ट आफ डरेक्टर यांस पत्र लिहिलें तें.

नंबर ६२ सन् १८५५

"आमचे दिवाण (सक्रतार) यांचे सांग"

"ण्यावरून कपतान कोपर साहेब यांणीं"

"दत्तक प्रकर्णावर एक गोषवारा तयार"
"केला आंहे, तो आपल्याकडेस पाठवि"
"ला आहे. आपण इंडिया सरकारचे म"
"ता प्रमाणें आम्हांस ता० २३ मार्च सन्"
"१८५३ रोजीं पत्र पाठविलें त्यावरून इ-"
"नामांस दत्तक सरकार परवानगीखे-"
"रीज खाजगी जिनगी प्रमाणें होतात"
"असें समजून लिहिलें, कीं चालू वहि"
"वाट जी दत्तक संबंधीं असेल त्यांत"
"बदल करूं नये."

"कपतान कोपर साहेब यांणीं दत्तक"
"प्रकर्णावर जो गोषवारा लिहिला आ"
"हे त्यावरून असें दिसतें कीं, सन्"
"१८१७ तागाईत १८२५ इसवीचे दरम्यान"
"सरकार परवानगी शिवाय कोणी द"
"त्तक इनामास झालाच नाहीं. सन्"

"१८२९ या सालांत एक संशययुक्त हुकू"
"म झाला, त्यामुळें वहिवाटींत कांहीं गळब-"
"ड सन् १८३६ ईसवी पर्यंत झाली. पुढें इ-"
"नामास दत्तक घेणें झाल्यास सरकारप-"
"रवानगीचें आगत्य आहे, असें समजून"
"वहिवाट चालू झाली."

"पेशवाईंतील वहिवाट कोपरसाहेब"
"यांणीं दाखवली आहे. त्यावरून दत्त"
"कास सरकार परवानगी लागत होती,"
"हें तर सिद्धच आहे, पण बापाचे मिळ"
"कतीस औरस मुलगा सरकार परवान"
"गीशिवाय हात लावूं सकत नसे. जेवेळे"
"स असे हुकूम देण्याचे प्रसंग येत, तेवे"
"स सरकारानें सुबलक नजरही घेतली"
"आहे. कोपर साहेब यांचा अमोलिक गो"
"षवारा आपले कउेस पाठवला आहे."

"व आपण चालू वहिवाटी प्रमाणें चा"
"लावें; म्हणून आम्हांस लिहिलें, तर"
"दुमाला ज्यास आहे, त्याला दत्तक घेणे"
"झाल्यास दत्तक घेण्यापूर्वी सरकारप"
"रवानगी अवश्य घ्यावी लागती. अशी"
"चालू वहिवाट आहे."

ता० १ माहे जुलई } सही अलपिष्टण साहेब.
सन् १८५५, } सही लमस्डन साहेब.
सही स्यालिरसाहेब.

वरील पत्रावर कोर्ट आफ डरेक्टर यांचा जबाब ता० १२ माहे मार्च सन् १८५६ इसवी रोजीं आला तो.

"कोपर साहेब यांचे गोषवाऱ्यावरून अ-"
"सें समजत आहे कीं, माजी राज्यांत जे लो"
"क माफीनें उत्पन्न खाणारे होते त्यांस"
"दत्तक घेण्यास सरकार परवानगीला-"

"गत होती व तीच वहिवाट सन् १८२५"
"इसवी पर्यंत चालली. सन् १८२५ इस-"
"वी या सालांत संशय युक्त हुकूम झा-"
"ल्यानें सन् १८३६ पर्यंत वहिवाटींत"
"कांहीं गडबड झाली. सन् १८३६ ईस"
"वी सालापासून पुढें सरकारपरवान"
"गीशिवाय सदरील लोकांत दत्तक हो-"
"त नाहींत असें दिसत आहे. सदरील"
"लिहिले कारणावरून तुम्हीं ता० २"
"मार्च १८५३ इसवीचा आमचा हुकूम चा"
"लू वहिवाटींत या कामांत बदल होऊन-"
"ये. म्हणून आहे. त्याचा अर्थ तुम्हीं चालू"
"वहिवाटींत दत्तकांस सरकारपरवानगी"
"अवश्य आहे, म्हणून जो केलात तो"
"आम्हांस मान्य आहे."

१४ पेशवाईंत नजर हावी त्यांकडून घ्यावी त्या कामां-

करितां मनुष्याचा मगदूर पाहून घेत असत, कुंभारा पासून देखील सरकारानें नजर घेतली आहे. अशी सर्व साधारण माजी राज्यांत नजर ही बाब असतां सदरीं लिहिलेले साहेबलोकांनीं या नजरेचा उपयोग विशेष करून दत्तक प्रकर्णांतच सरकारास दाखविला त्यावरून नजर घेतल्याशिवाय दत्तकास सरकारानें आपली मान डोलविलीच नाहीं. असें या सरकारचे मनांत आलें.

१५ या दत्तक निषेधक प्रकर्णांत अब्बल इंग्रजीपासून ठराव होत गेले, त्यांत अग्रवादी मेहेरबान हर्टसाहेब व मेहेरबान कोपर साहेब आहेत. हर्टसाहेबांनीं मोघम रीतीनें आपलें मत सरकारास लिहिलें, व कप्तान कोपर साहेब यांणीं तपशीलवार प्रमाण सहित आपलें मत सरकारास लिहून कळविलें.

१६ अ निशाणचे तक्त्यावरून व मेहेरबान मनरो साहेब यांचे मतावरून इनामें वगैरे खालसा कर-

ण्याचा अधिकार सरकारास आहे. येविशींचा सिद्धांत करून सरकारास साहेब मवसूफ यांणीं दाखवला. ज्या मुलुखांत नेहेमीं दंगा असे, व स्वस्तनेचें तर स्वम-च नाहीं. अश्या मुलुखांत बसून मनरोसाहेबांनीं आपलें मत लिहिलें, तें मत कदाचित त्या मुलुखास लागू असेल; पण या मुलुखांत म्हणजे दक्षणेत तें मत लागू करावें किंवा नाहीं. हा अधिकार ज्याचे हातीं असेल, त्याणें पाहावें. अ. निशाणचे तक्त्यांत रकमारें २९ उदाहरणें खालसातीचीं आहेत. त्यांत बहुतेक तर फंद फितुर याणें लोकांचीं उत्पन्नें खालसा केलीं आहेत, असें त्या तक्त्यावरून दिसतें, व थोड्यांचा ठिकाण लागत नाहीं: व कारण ही समजत नाहीं. यांचा निकाल ही पुष्कळ शोध केला असतां राज्यकारणाशिवाय दुसरें कांहीं एक कारण असेल असें होणार नाहीं. अश्या राजकीय गुन्ह्यास जीं पारिपत्यें झालीं, त्याचा शिरशिक्षा काढून स्वतंत्र राज्य कारखान्यांत

जरतो लागू केला तर या सरकारास चोरी वगैरे कि-
रकोळ अपराध करणारे लोकांस तोफेचे तोंडीं उडवा-
वें लागेल. या लिहिण्यांत इतकाच अर्थ समजावया-
चा कीं, राज्यांत गडबड झाली असतां, व स्वस्थता अ-
सतां हरएक राजाच्या दोन तऱ्हेच्या वर्तणुकी होतात.
तर गडबडीचे समयीं जी वर्तणुक झाली, ती देशां-
त स्वस्थता असतां चालू केल्यास त्या वर्तणुकीची
किती अप्रतिष्ठा होईल, हें सहज दिसून येईल.
तसेंच स्वस्थतेंत जी वर्तणुक केली, ती गडबडीचे सम
यांत लागू केली असतां तिची अप्रतिष्ठा इतकीच
होईल.

१७ जे लोक हरदम राजकारभार चक्रांत राजासं-
निध वागणारे त्यांचे मुलांस व वारसांस सरकारां-
त कळल्याशिवाय वडिलोपार्जित कामें त्यांस प्राप्त
होतील. हें अशक्य आहे. अश्या प्रकारच्या लोकांचीं
उदाहरणें काढून बापाचे उत्पन्नास औरस लेंकास

हात लावण्यास ताकद नव्हती. असा सीधा तक्का नि.
ब. यावरून झाला असावा, असें दिसतें.

१८ सरदार व शिलेदार ज्यांकडे लाखो रुपयांचे सरंजाम असत, व थोडें इनाम ही असे. त्या सरंजामाची व इनामाची तुलना केली असतां खंजीभर सरंजामांत पावरती इनामाचा अंश येईल, असेप्रकारचे लोक नेहेमी संनिधचा गणारे त्यांचे घरांत दत्तक होणें झाल्यास सरकारांत कळल्याशिवाय रुजविधान होणें बहुत मुष्किल होतें. सरंजामदारांस सरकारांत कळवल्ये वेळेस फक्त सरंजामापुरतीच सरकारची मान्यता मागणें हें ही होणें बहुत दुरापस्त समजलें पाहिजे. अश्या रीतीनें दत्तक घेण्यास सरदार व मुत्सद्दी यांणीं सरकारास विचारलें व सरकारांनीं होय म्हटलें. दत्तकाकडे महाल मुलूख व सरंजाम वगैरे जो चालावयाचा त्याचा उत्थार करते वेळेस कागदोपत्रीं इनाम सहज रीतीनें उत्थरलें गेलें.

या प्रमाणें गाउया बरोबर नव्यास याचा झाली. परंतु दत्तक मान्य करणारे यांची इच्छा व दत्तक घेणारे यांची आशा इनामाविषयीं बिलकूल नवती हें खचित आहे.

१९ इनामें विकणें व देणें झाल्यास त्यास देखील पेशव्यांची मान्यता लागत असे, म्हणून उ. नि. तत्त्यावरून सिद्धांत केला आहे. यांत देणारा व घेणारा असे दोन पक्ष आहेत. तर दोघांतून कोणी एक तरी राजकारभार चक्रांत वागणारा आहेच. असें या तत्त्यांतील उदाहरणांवरून दिसत आहे. उभयपक्ष केवळ रयत व उभयतांपैकीं कोणा एकाचाही संबंध राजाशीं रयतेच्या नात्या खेरीज दुसरे कोणते रीतीनें संबंध नाहीं. असें एकही उदाहरण नाहीं.

२० राज्यांतील एकंदर वस्ती असते त्यांपैकीं फार थोडके लोकच मुछदी व सरदार राजकारभार

च्यांत राजा संनिध वागणारे असतात त्यांशीं व रयते शीं जमीन असमानीची तफावत असते. व उभयतां शीं राजाचें वर्तन एकसारखें नसून स्थितिअन्वयें होत असतें, तरी मुछदी व सरदारवगैरे राजकीय कारभारांत निमग्न असणारे लोकांचीं अनेक उदाहरणें काढून रयतेस तीं लागू करणें ही गोष्ट प्रशस्त किंवा अप्रशस्त कशी असेल ती असो.

७१ शिंप्यानें दत्तक घेते वेळेस सरकारांत विचारलें, व सरकारनें कबूल केलें, या शिंप्याकडे इनाम सरंजाम वगैरे कांहीं नसून सरकारची परवानगी याणें घेतली. या वरून दत्तक घेते समयीं सर्व लोकांस सरकारांत पुसावें लागत असे. याविशींचा सिद्धांत झाला असेल. जो कोणी हें उदाहरण वाचील, त्याला हा शिंपी दरजी आहे असें वाटेल; पण या देशांत अडणाव शिंपी असून दरजी धंदा नकरितां कापडाचे व्यापार करणारे लोक लक्षाधीश

आहेत त्यांपैकीं हा सावकार आहे, दरजी नव्हे. साहेब बहादूर यांणीं यास अउणाव शिंपी असून हा व्यापार आहे असे लिहावयाचे असून फक्त दरजी म्हणून लिहिलें हें साहेब मवसूफ यांणीं समजून उमजून लिहिलें किंवा कसें लिहिलें हें कळत नाहीं. या शिंप्याचे उदाहरणास नारीकसन पेशव्यांनीं परवानगी दिल्याचा लागला आहे, त्याचा तपास पहातां भूतकर म्हणून पुणे शहरांत सावकार शिंपी अउनावाचे आहेत, व हा दत्तक त्यांचे घराण्यांतीलच सदरील तारखेस, व सालांत झाला असें कळतें.

२२ बाटलीवाले या अउनावावरून बाटलीचा व्यापार करणारा असा बोध सर्वांस होतो. परंतु सर जमशेटजी जिजीभाई यांची दौलत, व सरकारांत संमंध व प्रतिष्ठा पाहिली असतां अउनाव केवळ फिके पडतें. या बाटलीवाल्याचे घराण्यांत

इनाम सरंजाम वगैरे कांहीं नाहीं. पण एकादे स-
दरीं लिहिले कलमाप्रमाणें महत्कृत्य होऊं लाग-
ल्यास आमचे विलायतचे राणीसाहेबांस तें कृ-
त्य अनश्रुत राहील कीं काय? व बाटलीवाले रा
णी साहेबांस कळवल्याशिवाय असे महत्कृत्या
स आरंभ करतील काय? नाहीं.

२३ बाटलीवाल्याचे घराण्यांतील सर्व महत्कृत्यें
राणीसाहेबांस कळतात. म्हणून हिंदुस्थानांतील स
र्व सावकार लोकांचे घरांतील कृत्यें राणीसाहेबां
स कळावीं व कळत आहेत असें म्हणवत नाहीं.

२४. पेशवाईत चार सावकार होते त्यांत या घ
तकराची गणना होत असे, व यांचा पेशव्यांपाशीं
व्यापाराचे नात्यानें अती निकट संबंध असे म्हणून
याचे घराण्यांत झालेला दत्तक सरकारांत कळण्या
चें प्रयोजन झालें. यांत कांहीं नवल आहे असें ना
हीं. व हें विशेष उदाहरण काढून सामान्य वहिवा-

दीचा पुरावा करणें हें योग्य किंवा अयोग्य याचा विचार वाचणारांनीं करावा.

२५ मेहेरबान हटसाहेबयांणीं एतद्देशीयलोकांचे संस्थानांतून दत्तकास संस्थानचे अधिकारी यांची परवानगी लागते म्हणून लिहिलें आहे त्यास सांप्रतचीं संस्थानें इंग्रजसरकारचे राज्याचीं केवळ प्रतिबिंबें आहेत, रसिदंटाचे मर्जीनरूप संस्थाचे कारभारी जबाब देऊन रसिदंटसाहेबाची मर्जी रक्षण करितात. मुख्य मालकाची अवस्था पाहिली तर त्याना दत्तक हा शब्द माहित असण्याची भ्रांत मग रिवाजाविषयीं जबाब देण्याची शंकाच नको. ऐषआरामांत जे लोक निरंतर निमग्न असतात व कारभारी लोक पैक्याचे लोभानें हावीं तशीं कर्में करितात, अशा संस्थानांतून कायम त्त्येणार व आलें तरी भरवसा कितपत ठेवावा याविषयीं विशेष वादविवाद करणें ठीक नाहीं.

२६ मेहेबान आलपिष्टण साहेब यांणीं त्या देशांत जे कायदे चालू करावयाचे त्याचे मसूदे तयार करून ठेविले होते तेच कायदेकरून सन् १८२७ साली सरकारानें या देशांत जारी केले. असें अक्कलवान मुछदी साहेब मवसूफ मुंबईचे गव्हरनर असतां त्यांणीं दत्तकसंबंधी सन् १८२५ सालीं जो वर काढिला त्या अन्वयें वहिवाटनझाली म्हणून त्या वराची किंमत व खरेपणा कमी होत नाहीं. व्यापारांत धनकोरिणको यांचे दरम्यान दस्तऐवज होतो, त्या दस्तऐवजांतील मुदतीप्रमाणें रिणकोनामाने वसूल द्यावा. व धनकोनामानें वसूल करून घ्यावा, असे दोन धर्म दोघांचे आंगीं प्राप्त होतात. दस्तऐवजांतील कराराप्रमाणें उभयतांकडून वहिवाट न घडली तर खताचें खतपण कमी होईल कीं काय? तसे सदरीं सन् १८२५ तं जो वर झाला त्याप्रमाणें वागणें व वाग

वणें रयतेकडे व सरकाराकडे आहे तसें न झाल्या मुळें घट रद्द होईल कीं काय?

२७ दत्तकाची वहिवाट दुमालदार लोकांत होती ती खंडण करण्या करितां फार भगिरथ प्रयत्न झाला, तथापी अखेरीस सत्तेनें व लोभानें हें खंडण मत्तसिद्ध झालें. तर यास इतकी पंचाईत न पडतां दुसरा एक सुलभ रस्ता होता तो असा कीं, सरकारानें असें लिहावयाचें होतें कीं जोंपरयंत इनामें वतनें आम्हीं लोकांचीं खाजगत मिळकत आहे म्हणून समजत होतों तोंपरर्यंत दत्तकास परवानगी सरकारची लागत नव्हती. हें खरें परंतु जेथपासून सदरहू इनामें व वतनें वगैरे खाजगी मिळकत नाहीं. आणि त्यावर सर्व तऱ्हेनें सरकार चा दावा आहे. असें आम्हांस कळूं लागल्ये दिवसा पासून लोकांनीं इनामास व वतनास दत्तक घेण्या चें मनांत आणिल्यास दत्तक घेण्यापूर्वी सरकार-

ची परवानगी घेतजावी. असा ठराव केला आहे यां
त राजरोस इनसाफ होता व इतका उलटा प्राणा
याम करण्याचें आगत्यही नवतें.

२८ सरकार व त्याचे अमलदार यांचे मुरवतीक
रितां माजी राज्यांत दत्तकांस परवानगी लागत अ-
से. असें म्हटलें तरी सरकारानें दत्तक कोणीं मा
गितला असतां नाहीं म्हणण्याचा पाठ घातला आ
हे, तर या नकारास आधार कांहीं दिसत नाहीं.
पेशव्यांनीं कोणी दत्तक मागितला आणि त्यांणीं ना
हीं म्हटला असे प्रकारचे उदाहरणांचा तक्ता मेहे
रबान कपतान कोपर साहेब यांचे गोषवाऱ्यांस लग-
त झालेला नाहीं, व साहेब बाहादर यांणीं एकादें
उदाहरणही काढिलें नाहीं. असें असतां हजारों अ-
र्जदारांस सरकार तुमचा दत्तक कबूल करीत नाहीं
असा जबाब धडकाऊन देतें. यांत इतकेंच समज
लें पाहिजे कीं सत्तेपुढें इनसाफ व शाहाणपण

यांचा नखेरा चालत नाहीं.

## लोकांचीसमजूत.

या सरकारचा अमल या मुलखांत बसल्याव-
र जाहिरनामे व वर असे अनेक प्रकारचे दस्त ऐव
जानिशीं सरकारानें आपलें इमान रयतेस गुंतवून
दिलें आहे. व तें इमान गुंतवणारे मेहेरबान अलपि
ष्टण साहेबां सारखे मुछदी होते. या देशांतील सं-
स्थानिकांपेक्षां आपले राज्यावर प्रीति व विश्वास लो
कांचा ज्यास्ती आहे. तो हरएकरीतीनें कायम ठेव-
ण्यास सरकारानें उत्सुक असावें; म्हणून मेहेरबा
न मालकम साहेब यांचें मत लेखी आहे. असें अ-
सतां सरकार आमचे शंभर वर्षांचें भोग्य असतां
चाळीस वर्षें वजा करून बाकी पेशवाई बुडाले दि
वसापासून उलटीं साठवर्षें भोगवटा पाहातात, हा
आम्हां लोकांवर गहजब आहे. अलपिष्टण साहेब
यांणीं आपले अवलीचे जाहीरनाम्यांत इनामें

व वतनें जीं असतील त्यांचें संरक्षण करूं म्हणून ठरवि-लें आहे, व सांप्रत या खात्यानें ष दप्तकीनिषेधक ठ-रावानें इनामें व वतनें वगैरे सर्व हुमाल्यांची आरणी होऊन चांदी बनत आहे तर. अशी चांदी बनल्यावर जाहिरनाम्या प्रमाणें सरकार काय संरक्षण करणार आहे. हें आम्हांस कळत नाहीं.

इनाम सरंजाम वगैरे दुमाले या पेक्षां जमिदारी चे वतनावर लोकांची विशेष प्रीति आहे. सातारक र राजे सार्वभौम होते, पण इंदापूर महालची देशमु-खी व कांहीं गांवीं त्यांच्या पाटिलक्या होत्या. पेश वे अष्टप्रधानांत मोठे भाग्यशाली होऊन गेले. तेशि वर्धनगांवचे देशमुख होते. शिंदे आलीजाबाहादर यांचे कुळांत महादजी शिंदे मोठे कीर्तिमान सरदार होऊन गेले. पण पाटिलक्यांचीं वतनें खरेदी करण्या कडे त्यांचें विशेष लक्ष असे. लोकांनीं त्यास साहेब अगर रावबाहादूर न म्हणतां पाटीलबावा म्हणावें

हें त्यासे आंवडत असे. होळकर यांचे देशमुखीचें वतन नगर प्रांतीं आहे. कुंजर व दाभाडे यांच्या गांवोगावीं पाटिलक्या आहेत.

सदरीं लिहिले उदाहरणावरून जमीदारीचे वतनाची किती महत्वता होती व तीं वतनें संपादन करण्याची लोकांस किती आवड होती, व ते किती इसरत होते हे दिसून येईल. द्रव्यानें व श्रमानें लोकांनीं जमीदारीचीं वतनें संपादन केलीं व तीं त्या जमीदाराचे कुळांत फार दिवसापासून चालत आलीं. मिजासी मोंगलांनीं, उदार राजांनीं व दयावंत पेशव्यांनीं कोणीच या वतनांचा उछेद विनाकारण केला नाहीं. सांप्रतचे सराफी कारांत या वतनाचा रिकाव कसा लागेल तो लागो. या मुंबई इलाख्यांत जी वस्ती आहे त्यांत दुमालदार व जमीदार लोक फार थोडे आहेत, व यांच लोकांचें या खात्यापासून बरें वाईट होणार, व जी इतर वस्ती आहे तीस या खात्यापासून

कांहीं एक संपर्क नाहीं, म्हणून सरकारांत भासवून हें खातें उत्पन्न केलें असेल, तर एक वृक्ष आहे, आणि त्याचे फांदीस जर घाव घातला तर तो वृक्ष दुखवत नाहीं, पण वृक्षाचे बुंध्यास घाव बसला तर फांद्यांसहित तो वृक्ष डगमगूं लागेल यांत संवशय नाहीं. तसें या वस्तींत दुमालेदार लोकांचा भाग थोडा आहे तरी तो वस्तिवृक्षाचा बुंधा आहे असें समजलें पाहिजे.

हजार वळसे आणि एक गांव, परजन्यानें भिजवलें व वाहून गेले, अग्निनें पोळलें अगर दहन केलें, व राजानें मारलें अगर लुटून नेलें. याची फिर्याद कोण ऐकणारा समर्थ आहे, असा विवेक करून लोक विवंचनेंत निमग्न आहेत.

## सरकारचाउद्देश.

कोणतेही काळीं कोणतेही मुलुकांत मुख्य सरकारची स्थिति पाहूं लागलें असतां सरकारची

अवस्था आंधळ्यासारखी आढळते. सरकारास असें आंधळ्याचें सोंग घेतल्या शिवाय दुसरा उपाय राहत नाहीं. कारण सर्व कारभार एका मनुष्याचे हातून क चा होणें हें अशाक्य आहे. यामुळें जसा अंधाचा काठीवर विश्वास तसा सरकाराला आपले हाताखालील अंमलदारावर भरवसा ठेवणें जरूर पडतें. व ते सांगतील व म्हणतील तदनुसार वर्तावें लागतें.

एका हातीं आपले अंमलदार व दुसरे हातीं रयत धरून सरकारानें राजकारभार चालवावा हा उत्तम मार्ग पण भाषा, जात, धर्म, सत्ता व संपत्ती इत्यादिगुणें करून या देशांतील रयत सर्वस्वी पंगू आहे म्हणून यांचे अर्ज ऐकणें व यांस हातीं धरून चालणें हें देशांतील सरकारास मोठें लाजीरवाणें वाटतें. यामुळें या रयतेचे दुःखाकडे हें मुनीम सरकार सहज दुर्लक्ष करतें असेंही अनुमान केल्यास गैर नाहीं

या हिंदुस्तानचे मुख्य राजे विलायतेस आहेत त्यांस एतद्देशीय लोकांचा कळवळा असून निरंतर या लोकांचें कल्याण करावें, व या लोकांचे मनांत त्रास उत्पन्न न व्हावा, व कोणतेही रीतीनें या लोकांस तोशीस लागूं नये, म्हणून रात्रंदिवस ते झटत आहेत. येविशीं प्रमाणें हावीं तितकीं सांपडतील. त्यांचा उद्देश असा चांगला असून रयत दिलगीर कां याचें कारण असें आहे कीं, मुख्यांचे उद्देश अमलांत येत नाहींत. या देशांत जे अंमलदार साहेब लोक आहेत, हे त्या विलायतेंतील मुख्यांचे डोळे आहेत. हे जें सांगतील तें खरें मानून तदनुसार ते वर्ततात.

या देशांत सर्व सरकारी काम गुप्त चालतें, व अम्मलदारांची भाषा भिन्न या मुळें या लोकांस साहेब लोक काय लिहून पाठवतात, व विलायतेंतून मुख्य सरकार त्यावर जबाब काय देतात हें. कांहींच कळत नाहीं. या देशांतील साहेब लोकांचे एक तर्फी

लेखानें आह्मचे विलायतेंतील सरकारचे मनांत या देशांतील लोकांविशीं अनेक तरंग उठून भलते निकाल होतात व ते निकाल या गरीब रयतेस चिरकाल भोगावे लागतात.

ही अडचण दूर होण्यास एक उपाय आहे तो असा कीं, सरकारानें आपले हाताखालचे साहेबलोकांचे सरकारकामांत जे लेखपूस होतात ते समग्र छापून लोकांस कळण्याकरितां प्रसिद्ध करीत जावे म्हणजे अंमलदारांनीं जें कांहीं लिहिलें त्याची पारख होऊन शाकबेशाक वेळचे वेळेस होऊन सत्य काय असेल तें निघत जाईल. येणेकरून राज्यकर्त्यांस या देशांतील लोकांची काय दशा आहे ती कळत जाईल, आणि रयतेस सरकारचा मनोदय कळत जाईल, आशी परस्परें समज उमज जाल्यानें उभयतांस श्रेयस्कर होईल यांत संशय नाहीं.

# पुरवणी.

या इनाम कमिशनचें विश्वरूप कपतान कोपर साहेब यांचे कारकीर्दीत जसे प्रकार झाले; तेचमान पुढील कारकीर्दीत राहिले नाहीं. साहेब बाहादूर यांणीं या पुण्यांत घराच्या चौकशा सुरू केल्या होत्या व वाडगीं म्हणजे घरामागील परसें किंवा जुन्याइमारती पडून झालेल्या बखळी त्याच्याही कैफती घेत होते. व त्या पैकीं एकदोन ठराव ही झाले असें ऐकण्यांत आहे.

२ ही घरांची चौकशी उत्पन्न होण्यास कारण असें झालें कीं, बाजिराव रघुनाथ यांणीं या शहरांतील सरदार, गृहस्थ, व भले लोक यांच्या घरादारांच्या जपत्या विना कारण केल्या, त्या जपत्या कायम असतांच पेशवाई उधळली. पुढें तीं घरें मेहेरबान अलफिष्टण साहेब यांणीं ज्यांचीं त्यांस दिलीं. ज्यांचे मालक हजर न झाले तीं दुसऱ्यास दिलीं.

३ या आधारावरून कोपर साहेब चौकशी करीत होते. अलफिष्टसाहेबांनीं ज्यांस घरें दिलीं त्यांस कांहीं सनदपत्र दिलें नाहीं. केवळ तोंडच्या हुकुमावरून त्या लोकांस तीं घरें दिलीं. कोपर साहेब घराचे मालकास बोलावून आणून म्हणूं लागले कीं, तूं या घरांत राहातोस यास पुरावा काय? हा प्रश्न श्रवण करून लोकांस असें वाटूं लागलें कीं, हें इनाम कमिशन कांहीं कालानें आमच्या बायकांची देखील चौकशी करील. घराचे चौकशीस इनामकमिशनचे आक्टांत कांहीं एक आधार नाहीं.

४ नाना फडणवीस यांचे वाड्यांत पेशवे दप्तर आहे हें आबालवृद्धांस ठाऊक आहे. त्या वाड्यास पूर्वेस दोन सोपे आहेत त्या सोप्यांत इंग्रजी शा-ल्यापासून मंडईंत भाजीपाला आणणारे लोक आणलेला माल बाजारांत विकून भाकर खात असतात या वाड्याचे तोंडीच एक सरकार जागा

हौद आहे. गरीब मावळे लोक डोकीवर जिनसांचें ओझें, आणि पागोशीं भाकरी बांधून येतात. बरोबर भांडें आणण्यास त्यांस नसतें. सदरील सोप्यांत भाकर खाऊन, वाड्यांतील तोंडचे हौदावर ते गरीब लोक पाणी पितात. याप्रमाणें बहिवाट कोंपर नानाचा अम्मल सदरील वाड्यांत होईपर्यंत चालली. एजेंट, टरकांड, गोल्डस्मिड, आणि गार्डन, अंमानतदार अशा चार कारकीर्दी त्या वाड्यांत झाल्या, पण इतक्यांतून एकही अम्मलदाराचें त्या गरीब पामरांचें पाणी बंद करण्यास अंतःकरण कठोर झालें नाहीं. कोंपरसाहेब यांचा पाय या वाड्यांत एतांच लागलेच त्यांणीं या गरिबांचें वाड्यांत पाणी पिणें बंद केलें. आणि हुकूम केला कीं, त्या लोकांनीं वाड्यासमोरचे रस्यावरील हवदावर पाणी प्यावें. अशा हुकुमानें त्या गरीब लोकांस जी गैरसोई झाली, ती लिहितां येत नाहीं. रस्यावरील जो हौद आहे त्या हौदावर या मावळे लों

नवीन खर्च करणें झाल्यास सरकार हुकुमाशिवाय करूं नये; म्हणून वर आलाच आहे. कम्यांडर इन् चीफ साला बादप्रमाणें प्रांतांत फिरावयास जात असतां खर्चाकरितां त्यांस देण्यास मनाई केली, तर अशा प्रसंगास सरकारास जर पांच चार हजार रुपयांचा खर्च कमी करण्याचें संधान दाखविलें तर पांच लक्षांचे ठिकाणीं होईल यांत संशय नाहीं.

८ दुमाला रेविन्यू कमिशनर हा अधिकारी इनाम आक्टांत नसून सरकारानें नवीन कां उत्पन्न केला, याचा विचार पाहातां कसान कोपर साहेब यांस महत्पद प्राप्त व्हावें व त्याच खात्यांत त्यांणीं असून, इनामें, सरंजाम, जहागिरी, वर्षासनें,वगैरे सर्व देणग्या हिंदुस्थानींतील रयतेकडे चालतात, त्या चालविण्या न चालविण्याचा अभिप्राय त्यांचाच असावा. त्याखेरीज विशेष कारण दिसण्यांत येण्या-

सारिखें नाहीं. एजेंटीचें खातें बुडवलें, ते वेळेस एक मिनिट कौंसलांत झालें आहे. त्यावर गवरनर वगैरे मुच्छदींच्या सह्या आहेत. त्यांत असें लिहिलें आहे कीं, एजंटाचे खात्यानें सरकारी खजिना मात्र लुटला. दुसरें कांहीं एक झालें नाहीं. मेहेरबान एलिससाहेबासारखा सिकंदर दिवाण असतां कौपर साहेब दुमाला रेविन्युकमिशनर राहिले तर एजंटी बुडते वेळचा शेरा या दुमाला खात्यास लागू होण्यास कांहीं भ्रांत आहे की काय?

९. सरकारी नोकर लोकांस हरवक्त प्रांतांत फिरावें लागतें त्यांस खर्च जाजती लागतो, त्याचे बद्दल जो पैसा फिरणारे नोकर लोकांस सरकार देतें त्यास भत्ता म्हणतात. कलेक्टर व रेविन्युकमिशनर, ज्यांस प्रांतांत नेहेमी फिरावें लागतें त्यास आठ महिने सरकार भत्ता देतें. ह्या इनाम कमिशनचे अधिकाऱ्यांस घरून कचेरींत मात्र जावें लागतें, प्रांतांत ह्या लोकांस कधींच जावें लागत नाहीं. प्रथमतः दसर धामधुमींत या अधिकारी लोकांस फिरावें लागलें, तेथ

पर्यंत या लोकांस भत्ता मिळाला हा बाजवी आहे. पण आतां दुमाला रेविन्यु कमिशनर कोपर साहेब मुंबईत आहेत, यांस ३०० रुपये दरमाहा भत्ता काय म्हणून आहे? याचें कारण समजत नाहीं. या प्रमाणें सर्व इनाम कमिशनर व आसिस्टंट व सब् आसिस्टंट या प्रत्येकास बाहेर जावें लागत नाहीं, आणि फुकट भत्ता देतें यांत सरकारचा भोंगळपणा आहे, अगर या खात्यांतील अंमलदार यांवर सरकारची पूर्ण कृपा आहे म्हणून या खात्यास हवी तशी देणगी सरकाराकडून पावते असें दिसतें.

१० कोपर साहेब पुणे पाठशाळे कडील परीक्षेस कमिशनर नेमिले होते, तेव्हां साहेब बाहादूर यांनी शाळेची अव्यवस्था पुष्कळ लिहून, अखेरीस असें लिहिलें कीं, जर सरकारास असा पैसा खर्च करून असे विद्यार्थी बाळगणें असेल तर या विद्यार्थ्यांस एक इसपिताळ बांधून पोशिंदे करून ठेविल्यास बरें पडेल. तर आतां कोपर कृत काळेजाचें वर्णन दुमाला रेविन्यू कमिशनर, इनाम कमिशनर,

आसिस्टंट इनाम कमिशनर, व सब आसिस्टंट इनाम कमि- शनर, इत्यादि अंमलदारांस सरकार घर बसल्या मिंगनर भ- ना बारमाही देतें, तेव्हां हे अधिक दर्णे सरकारास असें पसंत पडलें, व मेहरबान कोपर साहेब यांचे लक्ष्यांत जानीचे खात्यांतील ही गोष्ट असतां सरकारचे कानावर घालण्या विषयीं का अनमान झाला, हे पाहून नवल वाट- ण्या सारखी गोष्ट आहे.

या इनाम कमिशन खात्याची वास्तविक हकीगत सामान्य- त वर्णिली आहे, या वरून त्या खात्यांत फेरफार झाले पाहिजेत, असें साधारणपणें लक्ष्यांत येईल; पण ते फेर- फार अशा जातीचे असावे कीं, ज्याच्या योगें रयतेस हि- त होईल असें वाटावें. आणि सरकारास ही रयत सुख झाल्याचे योगानें संतोष व्हावा. असें झाल्यावांचून रयतेच्या मनांतूनहें खातें प्रस्तुत जा गतीनें चालत आहे त्या रीतीनें चालत आहे तों पर्यंत या खात्याची गावड क- धीं जावयाची नाहीं.

## पेशव्यांकडील सरझालेले मुलुकांत मेहेरबान आनरेबल.एम्.अलपिंष्टण कुलअकत्यार कमिशनर यांणी जाहिरनामा लावला त्याचें भाषांतरः

बाजीराव गादीवर बसल्यापासून त्यांचे इलाख्यांत नेहेमी दंगा होत असे, येणेकरून प्रजेचें संरक्षण चांगले रीतीनें होईना. सरशेवटीं बाजीरावास त्याचे राज्यांतून हांकून दिल्यानंतर तो खंडेराव रास्ते यांचे आश्रयाखालीं वसईस जाऊन राहिला. ते समयीं त्याणें इंग्रज सरकाराशीं तह केला. त्यांणीं लागलाच त्याला त्याचे तक्तावर आणून बसवला. तेव्हांपासून मुलुखांत स्वस्थता व आबादी जी आहे ती सर्वांस महशूर आहे. बाजीराव पुनरपी आपले गादीवर आला त्या वेळेस त्याच्या इलाख्यांतील रयत लढाईनें व दुष्काळानें अतिशय बेजार झाली होती त्यास्तव पेशवे सरकारास काळीचा वसूल फारच

थोडा येत असे. बाजिरावमत्त्यानें मामलती देत हो
ता त्याचे अमलदार मनमानेल तसा वसूल करीत होते.
तथापी इंग्रज सरकारचे आश्रयानें ते त्यांपासून मुल-
खास आबादी झाली. येणेंकरून बाजिरावापाशीं द्रव्य
संचय बराच झाला. त्याचा व्यय तो सांप्रत आपले
हितकरत्याचे नाशास्तव करीत आहे. इंग्रज सरका-
रानें त्याचे खुद्द इलाख्यांचें संरक्षण करून त्याचे इत
र ठिकाणचे अमलास ही दुसरे कोणाची तोशीस ला
गूं दिली नाहीं. बाजिरावानें इंग्रज सरकारासीं तह के
ला त्याचे अगोदरच त्याची सत्ता त्याचे ताब्यांतील स.
रदारांवर नाहींशी झाली होती. ती इतर लोकांचें नुक
सान केल्याशिवाय इंग्रज सरकाराच्यानें स्थापित
होईना. परंतु जे वाजवी हक्क पेशव्यांचे इतर लोकां-
वर होते त्यांचा ठराव इंग्रज सरकारानें बहुत मी
नत वारीनें करून देवविला, व कितीएकांचा ठराव
करण्या जोग्या सवडीही काढिल्या. यांपैकीं बाजीरावाचा

व गायकवाड यांचा कांहीं लढा होता, त्याचा निकाल करण्याकरितां इंग्रजी सरकारांनीं गाईकवाडास सांगून त्यांजकडील वकील गंगाधरशास्त्री यास पुण्यास रवाना केलें. गंगाधर शास्त्री जो ठराव करीत होता, त्यांत पेशव्यांचा फायदा बहुत झाला असता. बाजीरावाबरोबर गंगाधर शास्त्री पंढरपूरचे यात्रेस गेले होते. तेथें बाजीरावासमक्ष त्यांस, त्र्यंबगजी डेंगळे पेशव्यांचा दिवाण याणें ठार मारलें. हें कर्म बाजीरावाचे सल्यानें झालें असावें, म्हणून सरकारचा वहीम त्याजवर होता. व त्याचे ताब्यांतील रयतेनें या कामाचा दोष त्याचे शिरावरच ठेविला. आपले दोस्तावर असा आरोप आला हें पाहून इंग्रज सरकार फार नाखुष झालें. याहत्ये बद्दल त्र्यंबकजीस मात्र शिक्षा करावी म्हणून इंग्रज सरकारानं फर्माविलें पण, बाजीरावानें अवज्ञा केली. शेवटीं इंग्रज सरकारानें आपला हुकूम अमलांत आणण्याकरितां पेशव्यांवर फौज रवाना

केली. त्या स्वारीबद्दलचा खर्च पेशव्यांस मागितला नाहीं. व अपराधी मनुष्यास त्याणें पाठीस घातला म्हणून त्यास शिक्षाही केली नाहीं. त्या स्वारीचा मूळ उद्देश बाजीरावानें त्र्यंबकजीस इंग्रज सरकाराचे स्वाधीन करावा इतका होता त्यास बाजीराव कबूल होताच त्याशीं पूर्ववत् प्रमाणें कांहीं एक कंपेशन करितां दोस्ती सरकारानें कायम ठेवली. अशाप्रकारें इंग्रज सरकार कृपाळूपणानें वागलें असतां बाजिराव इंडियांतील संस्थानांशीं इंग्रज सरकारचे नाशास्तव मसलती करूं लागला. अखेरीस बाजीरावाकडूनच बिघाड होण्यास आरंभ झाला. त्याणें आपले इलाख्यांत बंड उत्पन्न केलें, व त्या बंडखोरांस राजरोस मदत करूं लागला. अशा प्रसंगीं इंग्रज सरकारास लढायी शिवाय दुसरा उपाय राहिला नाहीं. इंग्रज सरकारचा नाश करण्या करितां जे संस्थानी लोक बाजीरावानें अनकूल करून घेतले होते

त्यांणीं कांहीं हलचाल करण्याचें आगोदरच बाजिरा घाचे इलारव्यांत इंग्रज सरकारची फौज शिरून त्याचे मुख्य राजधानी भोंवतें कडें घालून त्यास त्या शहरांत कोंडून टाकला. इंग्रजसरकारचे उपकार बाजीरावावर बहुत झाले. त्याची कृतज्ञता व इंग्रज सरकारावर इतबार बाजीरावाचा पाहून पुनरपी कांहीं गडबड न होई, असा करार सरकारानें करून घेऊन, त्याला त्या गादीवर पुनः कायम ठेवला. त्या करारापैकीं हा एक करार होता कीं, इंग्रजाच्या फौजेनें बाजिरावापाशीं गहावें, व त्याजबद्दलचा खर्च बाजिरावानें इंग्रज सरकारास द्यावा. ही गोष्ट बाजीरावानें कबूल करतांच त्याशीं स्नेह सरकारानें कायम ठेवला, आणि पेंढार यांचे पारिपत्यास स्वारीची तयारी केली. सर्व हिंदुस्थाना पेक्षां पेशव्याचे मुलखांत पेंढार फार माजले होते. त्या मुळें पेशव्यांचे मुलखाची खराबीही फार जाली. बाजीरावानें पेंढाऱ्यांचे पारिपत्यास मी कुमक करतों

म्हणून बात्यांत्कारी दाखवलें, व कुमकेचे निमित्तानें फौज ही पुष्कळ जमा केली. या समयीं हिंदुस्थानांतील संस्थानिकांनीं इंग्रजावर गर्दी करावी म्हणून बाजिरावानें द्रव्यानें अगर मेहनतीनें कांहींच हालचाल केली नाहीं. इंग्रज सरकारची फौज पेंढारी लोकांवर चालू झाली ही संधी पाहून बाजीरावानें विनाकारण एकाएकीं इंग्रजावर छापा घातला. इंग्रजसरकाराकडील वकिलाचा बंगला जाळला. हें कर्म हिंदुस्थानचे रिवाजास व राज्यनीतीस फार विरुद्ध केलें. वाटसरू लोकांस लुटलें. इंग्रजसरकाराकडील दोन सरदारांस हाल करून ठार मारलें. अश्या अघोर कृत्यास अंगभूत होण्यास बाजिरावास अननवित वाटलें असेल, तथापी खून करणाराचें पारिपत्य न होता अद्यापपरयंत ते लोक बाजिरावाचे चाकर आहेत सबब खुनाचा दोष त्याचेच माथां ठेवला पाहिजे. आजपर्यंत गंगाधर शास्त्री यांचे हत्येचे कर्मास

आपण अलिप्त होता; म्हणून बाजिरावानें दाखवलें;
पण लढायी सुरू झाल्यापासून बाजिराव त्रिंबकजी-
स मिळाला, या मुळें शास्त्री यांचे खुनांत बाजीराव
अपराधी आहे असें उघड रीतीनें दिसत आहे. अ
शीं अघोर व अनन्वित कर्में बाजीरावानें केलीं म्हणू
न इंग्रज सरकारास, त्यास राज्यावरून हांकून देऊन
त्याचा मुलुख काबीज करणें अवश्य झालें. बाजीरा-
वाचे पाठलागास एक फौजेची तुकडी गेली आहे, ती
त्यास चईन पडूं देणार नाहीं. दुसरी टोळी त्याचे इला
ख्यांतील किल्ले घेण्याकरितां गेलीच आहे. तिसरी न-
गरा कडून येत आहे. या शिवाय खानदेशांतून सर
टामस हिसलाप याजबरोबर मोठी फौज येत आहे
कर्नाटकांत मनरो साहेब मोठे फौजेनिशीं अमल बस
वीत आहेत. मुंबईहून फौज येऊन कोंकणांतील कि
ल्ले घेत आहेत, व अम्मल बसवीत आहेत. तरी थोड
केच वेळांत बाजिरावाचें म्हणून कांहींच राहाणार

नाहीं. सातारकर राजे बाजिरावानें आजपर्यंत अटकें-
त ठेवले होते. त्यांस हल्लीं खुले केले आहेत. इंग्रज सरका
रांतून राज्याचे व त्याचे कुटुंबाचें बुजरुखीमाफक वयो-
ग्यतेनुरूप राजांस मुलुख देऊन त्यांस स्वतंत्र संस्था
निक केले आहेत. याच इरादानें सातारचा किल्ला घेत-
ला आहे. व त्यावर राजाचें निशाण चढवलें आहे. राजा-
चे पदरची जुनी कारभारी मंडळी जी घरीं बसली होती,
त्यांस कामावर बोलावले आहेत. राजास जो मुलुख दिला
तो खेरीज करून बाकीचा मुलुख इंग्रज सरकारचे ताब्यांत
राहील. त्याचा वसूल सरकार घेईल, व त्या मुलखांतील
स्थावर व जंगम मिळखत त्यांचें रक्षण चांगले रीतीनें
केलें जाईल. सर्व वतनें व इनामें (वंशपरंपरेच्या जमिनी)
वर्षासनें (वार्षिक नेमणुकी) पूर्वीं प्रमाणें राखल्या जातील.
धर्माचे कामांत हात न घालतां, आहेत तसे चालवले जाती
ल, व लोकांच्या रीति भाति योग्य व सयुक्तिक असतील
त्या चालवल्या जातील. मसत्यानें मामले दिले जाणार

नाहींत. इंग्रेजसरकारतर्फेनें वसूल करण्याकरितां अमलदार नेमले जातील. वसूल करणारे अंमलदार शेतकरी लोकांस उमेद राहण्याकरितां प्रसंगानुरूप सूट देतील; तर कोणीही बाजीरावास अगर त्याचे पक्षाचे लोकांस वसूल देऊं नये. जर कोणी दिला तर इंग्रजसरकारांतून मजुरा दिला जाणार नाहीं. सर्व वतनदार व जमिनीचे वहिवाट करणारे जे लोक बाजीरावाचे लष्करांत असतील त्यांनीं तें लष्कर सोडून आजपासून दोन महिन्यांचे आंत आपआपले गांवीं यावें. सदरहू मुदतींत जे लोक येणार नाहींत, त्यांची नावनिशी जमीदार लोक कळवतील, तर त्या लोकांच्या गावगन्ना जमिनी असतील त्यांवर त्यांचा दावा कांहींएक राहणार नाहीं, व त्यांचा पाठलाग करून कंपनीसरकार नाश करील. बाजीरावाचे पक्षाचे अगर दुसरे जे लोक मुलखांत दंगा करीत असतील, अगर रहदारीचे रस्ते पाडतील, ते लोक जसजसे सांपडतील, तसतसे जिवें मारले जातील. तारीख ११ माहे फेब्रुवारी सन्न १८१८ इसवी

## जनरल जान मालकम यांनीं ता०१ जून सन १८१८ इसवीराजीं श्रीमंत बाजीरावसाहेब यांजकडे कांहीं करार लिहून पाठविले ते बाजीरावांनीं कबूल केले, त्यांचा तपशील.

१ श्रीमंत बाजीरावसाहेब ह्यांनीं आपला खुद व आपले वंशजांचा जो पादशाही हक्क पुण्याचे गादीवर असेल त्याचा बेदावा देण्यास कबूल व्हावें.

२ श्रीमंत बाजीरावसाहेब ह्यांनीं आपले नोकरलोक व बायकाबच्चे सुद्धां ब्रिगेडियर जनरल मालकम यांचे छावणींत फार जलद यावें. त्यांची मानप्रतिष्ठा राखली जाईल. काशी, प्रयाग, व आणखी तीर्थांच्या जागा हिंदुस्थानांत आहेत, त्यांपैकीं ज्या ठिकाणीं पेशव्यांचे राहाण्यास इच्छितील, ती जागा गवर्नर जनरल कबूल करतील, व तेथें पेशव्यांस परिवार कडून बिनधोक पोंचवून दिले जातील.

असतील, त्यांजबद्दल श्रीमंत रदबदली करतील तर त्यां-
वर मेहेरबानगी होईल.

सदरीं लिहिल्याअन्वयें हा खलिता पोंचल्यापासू-
न चोवीस तासांचे आंत श्रीमंतांनी कबूल करून जन-
रल मालकमसाहेब यांचे लष्करांत यावें. सदरच आमचे
महाल्यास लढाई मंजूर आहे. मागून कांहीं एक सबब
मंजूर होणार नाहीं.